Prepared under the direction of the History
and Geography Books Committee
appointed by Government

# मानवी संस्कृतीचा इतिहास




लेखक

**चिंतामण गणेश कर्वे, बी. ए.**

संपादक, महाराष्ट्रीय ज्ञानकोश

व

महाराष्ट्र शब्दकोश;

सुपरिंटेंडेंट, पूना नाइट हायस्कूल.





१९२० ] [ किं. ६ आ

# लेखकाचा खुलासा

अगोदर संस्कृति म्हणजेच मोठा व्यापक विषय; व त्यांतून ती अखिल मानवजातीची द्यावयाची म्हणजे तर केवढा जगङव्याळ पसारा आवरावयाचा! जगाच्या आरंभापासून आजतागायत जगाच्या अफाट पाठीवरील सर्व मानव्याचा सर्वच बाबतींतला इतिहास म्हणजेच मानवी संस्कृतीचा इतिहास म्हणता येईल. कारण संस्कृतीमध्ये काय येत नाहीं? धर्म, राजकारण, भाषा, वाङ्मय, व्यवहार इत्यादि अनेक गोष्टींवरून संस्कृति अजमावयाची असते; तेव्हां सामान्य प्रौढ साक्षर माणसाला समजेल असें छोटें पुस्तक या विषयावर लिहिणें किती अवघड होऊन बसते याची कल्पना सहज येणार आहे.

आपल्या मराठी भाषेत या विषयावर स्वतंत्र वाङ्मय अद्याप तयार झालें नाही. महाराष्ट्रीय ज्ञानकोशाच्या २२ खंडांतून आणि इतर अनेक ऐतिहासिक पुस्तकांतून विखुरलेली माहिती जमा केली तरच सर्व मानवी संस्कृतीचा इतिहास कळणार आहे. एकच एक ग्रंथ घेऊन हा इतिहास पाहूं म्हटल्यास साधणार नाही. तेव्हां प्रथम जिज्ञासा उत्पन्न होण्यासाठीं लघुग्रंथ ( **Hand-book** ) लिहून तयार ठेवल्यास, या विषयास वाहिलेला मोठा ग्रंथ तयार होणें आवश्यक वाटेल व तो लवकर निघेलहि; अशी आशा धरून हा लहान संक्षिप्त इतिहास संपादिला आहे. सर्व विषयांचें सर्वसाधारण ज्ञान प्रत्येक प्रौढ माणसाला हवें व त्यासाठीं अशी निरनिराळ्या विषयांवरची माहिती सुबोध पण त्रोटक रीतीनें देणारीं पुस्तकें तयार ठेवावीं, हा सरकारचा विचार आणि त्यासाठीं सरकार करीत असलेले प्रयत्न स्तुत्य नाहींत असें कोण म्हणेल? जसें बालांसाठीं तसें प्रौढांसाठींहि योग्य वाङ्मय सर्व देशी भाषांतून पाहिजे व या कामीं सरकारनेंच हात घातल्याशिवाय इष्ट हेतु साध्य होणार नाहीं याची जाणीव प्रत्येक सुशिक्षितास आहे. तेव्हां या पुस्तकाप्रमाणेंच इतर शास्त्रीय व सामान्य विषयांवरील पुस्तकें लेखकांस योग्य मदत देऊन सरकार प्रसिद्ध करवील, अशी आतां लोकांना खात्री वाटूं लागली आहे; असो.

या लहान पुस्तकांत संस्कृतिसाहाय्यक असे आणखी किती तरी विषय विस्तृत विवेचिण्याचे राहून गेले आहेत. पण सर्वच पात्रें एकदम रंगभूमीवर आणिल्यानें नाट्यकवीला जसा सर्वांचा सारखा परामर्श घेतां न येऊन उलट नाटकांत गोंधळ माजविल्याचा दोष मात्र पदरीं घ्यावा लागतो, तसा गोंधळ येथें संस्कृतीच्या भिन्न भिन्न अशा सर्वच अंगांविषयीं विचार करितांना होणार आहे. शिवाय मानवी संस्कृतीच्या इतिहासांत सुसंबद्धता कशी सांपडणार? साराच इतिहास बदलत चालला आहे, पुढील शोध मागील सिद्धांतांना खोटे पाडीत आहेत व जगाच्या प्रगतीची भरधांव दृष्टींत ठरण्यासारखी नाहीं; तेव्हां हा छोटा इतिहास तरी मानवी संस्कृतीचा पूर्ण आदर्श कसा राहणार?

---

# अनुक्रमणिका



---

# उपोद्घात

## संस्कृति म्हणजे काय ?

संस्कृति हा शब्द अलीकडे इंग्रजी ' सिव्हिलिझेशन ' याला प्रतिशब्द म्हणून वापरण्यांत येतो. सिव्हिलिझेशन याचा व्यापक अर्थ धर्म, आचार, विचार, नीति, बुद्धि इत्यादि सर्व बाबतींत सुधारणा किंवा प्रगति. तेव्हां संस्कृति म्हणजेहि हीच सर्वांगीण प्रगति होय. अखिल मानव जातीची संस्कृति लक्षांत घेणें झाल्यास, जगांतील सर्व लोकराष्ट्रें आणि जाती यांची सामाजिक, धार्मिक, नैतिक, बौद्धिक आणि राजकीय सुधारणा अगदीं आरंभापासून आतांपर्यंत कसकशी होत गेली आहे व तिच्या अनुरोधानें सृष्टीच्या उत्पत्तिकालापासून आजतागायत मानव समाज कसा बनत आला आहे हें पाहिलें पाहिजे.

**संस्कृतीची व्याख्या**

वस्तूंवर अंतर्बाह्य जो संस्कार घडतो ती त्याची संस्कृति होय. या दृष्टीनें पहातां, प्रत्येक प्राणिमात्राची व तसेंच समाजाची संस्कृति भिन्न भिन्न असणार यांत संशय नाहीं. तथापि एक सबंध ज़ात, समाज किंवा राष्ट्र घेऊन त्याची संस्कृति शोधावयाची व ती दुसऱ्या राष्ट्राच्या संस्कृतीशीं ताडून पहावयाची असा प्रकार नेहमीं करण्यांत येतो. याचें कारण असें करणें सुलभ व फायद्याचें असतें. संस्कृतिसंशोधनाचे घटक लोकराष्ट्रें असून या राष्ट्रांच्या स्वतंत्रपणें बनलेल्या संस्कृती संशोधक पंडित फार बारकाईनें पहातात व त्यांवरून एकमेकांशीं तुलना करून कोणत्या राष्ट्राची संस्कृति हलकी व कोणती श्रेष्ठ हें ठरवितात.

**संस्कृतींची तुलना**

## मानवी संस्कृतीचा इतिहास

आजची संस्कृति

आतां अखिल मनुष्यजातीची संस्कृति ठरवितांना जें लोकराष्ट्र अत्यंत पुढारलेलें असेल त्याचीच संस्कृति मानवी संस्कृतीची आजची परिणति किंवा शेवटची अवस्था धरावी लागेल. मध्य आफ्रिकेंतील कांहीं लोकसमाज अगदीं रानटी स्थितींत आहेत म्हणून आजकालचा सर्व मानवसमाज रानटी आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. जगांतील सर्वच लोकसमाज एकाच चालीनें चालत नसतात. कांहीं समाज संस्कृतीच्या बाल्यावस्थेंत तर कांहीं प्रौढावस्थेंत असतात. तेव्हां मानवी संस्कृतीचा इतिहास देतांना, जगदुत्पत्तीपासून चालू शतकापर्यंत निरनिराळ्या काळांत जीं राष्ट्रें पुढारलीं व जे नवीन शोध निघाले व त्यामुळें सुधारणेंत भर पडली त्यांचीच माहिती प्रामुख्यानें लिहावी लागेल.

---

# प्रकरण १ लें

## संस्कृतीचा उदयकाल

**पृथ्वीची कल्पना**

ज्या या पृथ्वीच्या पाठीवर मनुष्याची हालचाल चालली आहे ती आहे तरी केवढी याचा कांहीं अंदाज आपणांला असणें जरूर आहे. एकंदर पृथ्वीच्या पृष्ठभागाचें क्षेत्रफळ अदमासें वीस कोटी चौरस मैल भरेल. तथापि एवढ्या मोठ्या क्षेत्रफळाचा पाव हिस्साच काय तो जमिनीच्या वांट्याला आला आहे. तेव्हां सुमारें ५ कोटी चौरस मैल जागेवर मनुष्यप्राणी नांदत आहे व बाकीचा पृष्ठभाग पाण्यांत बुडालेला आहे.

**सजीव पृथ्वी व उत्पत्तीचा इतिहास**

पृथ्वीवर सर्व प्राणी आणि वनस्पती एकदम एकाच वेळीं निर्माण झालेल्या नाहींत. प्रथम समुद्रांत माशांसारखे प्राणी उत्पन्न झाले, मग जमिनीवर वृक्षवनस्पती आणि सरपटणारे प्राणी उत्पन्न झाले, व शेवटीं पक्षी आणि सस्तन प्राणी उत्पन्न झाले असें शास्त्रज्ञ सांगतात. सस्तन प्राण्यांत सुद्धां मनुष्यप्राणी प्रथम निर्माण झालेला नव्हे तर बहुधा शेवटीं झाला असावा असें म्हणतात. हा मनुष्योत्पत्तीचा काल दहा लाख वर्षांपूर्वीचा तरी आहे खास. हें व यासारखींच पृथ्वीवरील अति प्राचीन जीवजंतूंच्या अस्तित्वाचीं अनुमानें काढण्याला खरेखुरे आधार सांपडले आहेत. हे आधार म्हणजे खडकांवरील प्राचीन प्राण्यांचे अवशेष व खुणा होत. यांखेरीज शिंपा, तंतू, फळें, पावलांचे ठसे, ओरखडे वगैरे अनेक

साधनांवरून संशोधक पृथ्वीवरील प्राचीन घटनांची कल्पना बांधीत असतात. असो.

**आद्य संस्कृति व सुधारणेचीं युगें**

आज उपलब्ध असणाऱ्या अवशेषांवरून सुमारें चाळीस पन्नास हजार वर्षांपूर्वीच्या मानवी संस्कृतीची कांहीं कल्पना येते. इतक्या प्राचीन काळींहि सर्व माणसें एकाच वंशाचीं किंवा वर्णाचीं नसावींसें वाटतें. आज ज्याप्रमाणें पांढरे ( आर्य ), काळे ( नीग्रो ), पिवळे ( मंगोली ) इत्यादि वर्णभेद आपण पाडतों त्याचप्रमाणें त्या वेळीं कांहीं दोनतीन तरी वर्ण-( वंश )भेद असावेत. त्या वेळचे लोक शिंपांच्या माळा करून गळ्यांत घालीत, हाडांदगडांच्या मूर्ती करीत व रंगीत चित्रेंहि काढीत. यालाच **संकृतीचा उदयकाल** म्हणतां येईल. या वेळीं मनुष्य दगड तासून केलेलीं हत्यारें वापरीत असे, म्हणून या युगाला पाषाणयुग म्हणतात. या युगांतील माणसें पृथ्वीवर सर्वत्र पसरलेलीं आढळतात व सर्व मानवजातीची हीच एक आद्य संस्कृति सर्वसामान्य आहे; पुढें वेगवेगळे मानवसमाज वेगवेगळ्या काळीं सुधारत गेले व त्यामुळें सर्वांची संस्कृति केव्हांहि एक राहिली नाहीं.

**पाषाणयुग: पुरातन व नूतन**

पाषाणयुग किंवा अश्मायुधयुग हें मानवी संस्कृतीचें आद्ययुग आहे. या युगाचे पुन्हां त्यांतील सुधारणांच्या अवस्थानुरूप दोन भाग पडतात: पुरातन पाषाणयुग व नूतन पाषाणयुग. पहिल्या युगांत मनुष्य शिकार करून रहात असे. त्याच्या शिकारीचीं हत्यारें म्हणजे दगड. धनुष्यबाण अद्याप त्याला करितां येत नव्हता; तसेंच जनावरें पाळण्याचें व त्यांचा उपयोग करण्याचें

त्याला माहीत नसावेंसें दिसतें. त्या काळीं गवे व तट्टे असत पण कुत्रे मात्र नव्हते. शेतकी करणें किंवा घरें बांधणें ही कला त्याला अवगत नव्हती, एवढेंच नव्हे तर स्वयंपाकाचीं भांडींसुद्धां त्याला करितां येत नसत; मग टोपल्या किंवा कापड विणणें कोठून येणार ? तो कधीं पांघरावयास कांतडीं घेई; एऱ्हवीं नागवाच फिरे. पुढें पुढें नद्या-सरोवरें अस्तित्वांत आल्यावर तो मासे मारून खाई. त्याला इतर कला-कसुरींचीं कामेंहि थोडथोडीं येऊं लागलीं. त्यानें केलेल्या हाडाच्या सुया बऱ्याच पुढच्या कालांतील रोमन लोक करीत असलेल्या सुयांपेक्षां चांगल्या ठरतात. या पुरातन पाषाणयुगीन लोकांप्रमाणेंच संस्कृतीच्या अगदीं बाल्यावस्थेंत असलेले लोक परवांपर्यंत टॅस्मानियांत दिसत असत. इतर सुधारत चाललेल्या जगापासून अनेक शतकें ते तुटकल्यामुळें गेल्या शतकापावेतों अगदीं रानटी अवस्थेंत तसेच राहून गेले होते.

**नूतन पाषाणयुग व त्या वेळचा भूगोल**

मागें पृथ्वीवर चार हिमयुगें होऊन गेलीं म्हणतात. त्यांपैकीं चवथ्या हिमयुगांत पुरातन पाषाणयुगाचा काल पडतो. यानंतर हिमयुग संपून नूतन पाषाणयुगाला आरंभ होतो. या युगांत मनुष्य बराच सुधारून शेतकी करावयास लागतो व जनावरेंहि पाळतो असें दिसतें. त्याचीं हत्यारें पूर्ववत् तासीव दगडाचीं असलीं तरी ते दगड घांसून सुंदर व एकसारखे गुळगुळीत केलेले असत. टोपल्या विणणें, झाडांचे दोर काढून भरड कां होईना पण कापड तयार करणें, ओबडधोबड भांडीं बनविणें यासारख्या कला त्याला अवगत झाल्या. पाषाणयुगांत मनुष्यवस्ती

आरंभीं युरोपखंडाच्या आग्नेयभागांत असून हवामानांत इष्ट फरक जसजसा होत गेला तसतशी वस्ती पूर्वेकडे आणि उत्तरेकडे पांगत गेली. येथें असें एक लक्षांत घेणें जरूर आहे कीं, मागें पृथ्वीच्या पाठीवरील जमीन आणि पाणी यांची विभागणी व स्थानें नेहेमीं एकसारखींच होतीं असें नसून, ज्या ठिकाणीं आज जमीन दिसते त्या ठिकाणीं पूर्वी समुद्र होता किंवा उलट ज्या ठिकाणीं आज समुद्र आहे त्या भागांत पूर्वी एकदां जमीन होती, अशीं अनेकदां अनेक स्थित्यंतरें झालीं आहेत. उदाहरणार्थ, पुरातन पाषाणयुगांत भूमध्यसमुद्राच्या ठिकाणीं एक मोठी दरी होती ती नूतन पाषाणयुगांत ( सुमारें इ. स. पूर्वी १०,००० वर्षें ) पाण्यानें भरून आजच्या समुद्राच्या स्थितीला पोहोंचली. कॅस्पियन समुद्र आजच्या इतका लहान नसून काळ्या समुद्राला जोडला गेला असला पाहिजे. म्हणजे त्या काळीं मध्य आशियाखंडांत एक मोठा समुद्र असून त्याच्या भोंवतालचा प्रदेश अत्यंत सुपीक असल्यानें मनुष्यवस्ती या क्षेत्रांत विशेष असावी. आशिया व अमेरिका हीं खंडें बेहरिंगच्या सामुद्रधुनीपाशीं जोडलेलीं असून या दोन्ही खंडांचें एकमेकांशीं दळणवळण होत असावें यांत शंका नाहीं.

**मनुष्याचा व्यवसाय आणि रहाणी यांत कालमानानें बदल**

मनुष्याचा व्यवसाय जसजसा बदलत चालला तसतशी त्याची रहाणीहि बदलूं लागली. ज्या वेळीं प्राण्यांची शिकार करून तो उदरनिर्वाह करी त्या वेळीं ज्या ठिकाणीं पुष्कळ प्राणी आढळतील अशाच रानावनांतून तो रहात असे व प्रत्येकाच्या वांट्याला भरपूर शिकार यावी म्हणून त्या वेळचीं माणसें एकमेकांपासून अतिशय दूरदूर रहात असलीं

पाहिजेत. पुढें प्राणी मारून दिवस कंठण्याचें सोडून देऊन मनुष्य गवत खाणारे प्राणी बाळगूं लागला व या पाळलेल्या प्राण्यांपासून तो आपल्या अडचणी दूर करून घेई. त्याच्या ग्रामपशूंना खाण्यास गवत लागे म्हणून तो माळरानावरच राहूं लागला. यानंतर त्याची प्रगति होऊन तो शेतकी करूं लागला. खाण्यापिण्यासाठीं व वस्त्रप्रावरणासाठीं तो जमीन आणि हवापाणी पाहून निरनिराळ्या वृक्षवनस्पती वाढवूं लागला. पुढें या धंद्यांत सुधारणा करून तो कांहीं जातींच्या गवतांपासून तांदूळ, गहूं, बाजरी वगैरे धान्यें पिकवूं लागला. त्याचप्रमाणें फळझाडांवरहि प्रयोग करून मधुर रसाळ फळें तयार करूं लागला. बऱ्याच वर्षांच्या व बऱ्याच जणांच्या अनुभवांनीं कोणकोणत्या वृक्षवनस्पती मनुष्याच्या उपयोगी आहेत हें ज्ञान मनुष्यप्राण्याला प्राप्त झालें. यापुढची सुधारणेची पायरी म्हणजे जमिनीच्या पोटांतून धातू काढून त्यांच्या वस्तू बनविणें व त्यांची देवघेव करणें ही होय. त्याला या पायरीवर येण्यास कितीतरी शतकांचा काळ लोटला असला पाहिजे. मनुष्येतर प्राण्यांसारख्या जंगली अवस्थेंतून सुटून एकमेकांत व्यापारव्यवहार करण्यालायक संस्कृतीपर्यंत, म्हणजे आद्य पाषाणयुगाच्या प्रारंभापासून लोहयुगापर्यंत पोहोंचण्यास मनुष्याला कितीतरी प्रयास पडले असले पाहिजेत व त्याच्या कितीतरी पिढया या सर्व प्रयोगांत गारद झाल्या असतील याची आज बरोबर कल्पनाहि येणें कठीण आहे. तथापि इतकें तरी उघड होईल कीं, मनुष्यप्राणी आपल्या सुखासाठीं सुधारणेचा अवलंब करीत होता व तसें करतांना त्याला मूळची नैसर्गिक रहाणी कष्टानें बदलावी लागत असे.

सामाजिक जीवनाची आवश्यकता उत्पन्न झाली

मनुष्याचें सामाजिक जीवन कसें बनत गेलें हेंहि पहाणें आवश्यक व मनोरंजक आहे. ज्या वेळीं जनावरांसारखें रहाण्याचें सोडून मनुष्य झोंपडी बांधून राहूं लागला, त्या वेळेपासून कौटुंबिक जीवनास व मालमत्तेच्या कल्पनेस सुरुवात झाली. कुटुंबांत स्त्रियांनीं कोणतीं कामें करावींत व पुरुषांनीं कोणतीं उरकावींत यांसंबंधीं आपआपसांत सहकारितेच्या तत्त्वावरच वांटण्या झाल्या. प्रत्येकास कुटुंबाचा अभिमान या वेळीं जाणवूं लागला असला पाहिजे. कौटुंबिक रहाणीमुळें माणसाच्या शरिरावर व मनावर सुखदायी परिणाम होऊं लागला व सुखाची आवश्यकता उत्पन्न झाली. पण हीच सुखलालसा भांडणतंट्याला मुख्य कारण होऊन बसली! तसेंच रहाणी आणि वस्ती एकच असल्यामुळें सर्वांच्या चालीरीती आणि स्वभाव एकाच धर्तीचे बनून गेले. त्या वेळच्या समाजाच्या करमणुकीच्या गोष्टी म्हणजे गाणें आणि नाचणें होत. या बाबतींत लोकांकडून जास्त शाबासकी कोण मिळवितो, यासंबंधीं चढाओढ साहजिकच सुरू झाली. सर्वांनाच या कलांमध्यें सारखें नैपुण्य मिळवितां येणें शक्य नसल्यानें समाजांत विषमता उत्पन्न झाली व तिच्या मागोमागच गर्व, तिरस्कार, असुया यांसारखे दुष्ट विकार माणसाच्या मनांत शिरले. स्वतःची किंमत कळण्याइतका अहंकार उद्भूत झाला तेव्हां सभ्य वर्तणुकीची अपेक्षाहि आली. या सर्वांचा परिणाम म्हणजे भांडणें आणि सूड यांची अव्याहत परंपरा. अशी परिस्थिति असतांहि या वेळचें हें साधें सामाजिक जीवनच मानववंशाच्या आजतागायतच्या जीवनश्रेणींत अत्यंत सुखाचें म्हणतां येईल. कारण कोणी

कोणावर अवलंबून नसे, प्रत्येक माणूस आपआपला धनी. पण हें स्वातंत्र्य संस्कृतीची वाढ होत गेली तसें कमीकमी होत चाललें. ज्या वेळीं दुसऱ्याची मदत घेणें श्रेयस्कर वाटलें व तसेंच दोन माणसांना पोसणें हें फायद्याचें दिसलें त्या वेळींच माणसामाणसांत कमजास्त दर्जा उत्पन्न झाला, मालमत्ता होऊं लागली व मजूरवर्ग निघाला. तथापि पूर्वी ज्या जागीं रान दिसत असे त्या जागीं आतां शेतें डुलूं लागलीं. पण या शेतांच्या पिकांबरोबर दास्याचेंहि पीक होऊं लागलें व माणसाच्या हीन दशेला प्रारंभ झाला!

**सामाजिक बंधनें**

कारण, मनुष्याला धातू शोधून उपयुक्त जिन्नसा तयार करितां येऊं लागल्या व शेतकींतहि तो तरबेज झाला खरा, पण त्याच्या प्रगतीचा परिणाम मात्र अहितकर दिसूं लागला. तरी ही अहितता नाहींशी करण्यासाठीं सामाजिक बंधनें ऊर्फ कायदे निघाले. या सामाजिक कायद्यांमुळें नैसर्गिक स्वातंत्र्य पार गेलें व माणसामाणसांमधील विषमता जास्त जास्त वाढण्याला मदत झाली खरी; पण त्यास इलाज नव्हता. असो.

**राजकीय बंधनें, राजे व राज्यक्रांत्या**

अशा रीतीनें सर्व जमातींतून सामाजिक बंधनें हळू हळू निर्माण झाल्यावर राजकीय बंधनांची आवश्यकता साहाजिकच भासूं लागली. कारण एरव्हीं जमातीचें रक्षण करावयाचें कसें? तेव्हां जे जमातीचे पुढारी तेच राजे होऊन बसले व माणसांतील विषमतेचा कळस झाला! पुढें राजे जेव्हां अति जुलमी होऊन त्यांना ज्यांनीं राजे केले त्या माणसांनाच छळूं लागले, तेव्हां पुन्हां सामान्य माणसामाणसांत समता उत्पन्न होऊं लागली. पण ही समता

केवळ त्यांची क्षुद्रता आणि दुर्बलता या बाबतींतच! तेव्हां साहजिकच माणसांनींच केलेले सामाजिक, राजकीय कायदे माणसें मोडूं लागलीं. बळी तो कान पिळी असें होऊं लागलें व जुलमी राजांना गादीवरून खालीं ओढण्यांत माणसांची एक जूट दिसूं लागली. पुढील इतिहासांत अशा तऱ्हेचे प्रकार अनेक वेळां झालेले दिसतील. स्वातंत्र्य संपादणें आणि गमावणें या बाबतींत माणसामाणसांत झालेल्या चुरशी, लढाया व क्रांत्या यांनींच एकंदर जगाचा इतिहास भरून गेलेला आढळणार आहे.

---

## प्रकरण २ रें

# प्राचीन संस्कृतीचीं राष्ट्रें

**प्राचीनतम राष्ट्रें**

या पृथ्वीच्या पाठीवर आतांपावेतों होऊन गेलेल्या राष्ट्रांत ज्यांची संस्कृति अतिप्राचीन अशी आढळते तीं राष्ट्रें दोनच: मिसरी आणि बाबिलोनी. या दोन प्राचीनतम राष्ट्रांपैकीं पुन्हां जास्त प्राचीन कोणतें हे निश्चितपणें सांगतां येत नाहीं. कारण दोघांचेहि प्राचीन अवशेष समकालीन सांपडले असून त्यांपासून निघणारा इतिहासहि सारखाच प्राचीन आहे. तेव्हां प्रथम मिसर ऊर्फ ईजिप्त राष्ट्राकडे वळूं.

**मिसर ऊर्फ ईजिप्त**

अलीकडे इतिहास-संशोधनार्थ ज्या विलक्षण खटपटी चालतात, त्यांमुळें जगाचा इतिहास बराच मागेंमागें जाऊं लागला आहे. ईजिप्तचा इतिहास असाच मागें जाऊन आज खि. पू. पांचसहा हजार वर्षांपर्यंत भिडला आहे. इतक्या प्राचीन

काळींहि ईजिप्त बरेंच सुधारलेलें होतें असें दिसतें. शिल्पकलांमध्यें मिसरी लोक फार निष्णात होते, असें म्हणण्याला प्रत्यक्ष पुरावे सांपडले आहेत. मिसरी चित्रकला, मूर्तिकला आणि बांधकाम हीं विशेष सुबक व उठावदार होतीं असें उपलब्ध अवशेषांवरून ठरतें. कारागिरांचीं हत्यारें, लढाईचीं शस्त्रास्त्रें व शेतकी आणि इतर धंद्यांचीं आयुधें साधारणत: हल्लींच्या धर्तीवरच असलेलीं आढळतात. या कलांचा विकास हळू हळू कसा होत गेला, हेंहि संशोधलेल्या वस्तूंवरून कळून येतें व त्यांचा कालहि लावतां येतो.

**मिसरी राजघराणीं**

हिंदुस्थानवर स्वारी करणाऱ्या शिकंदर बादशहाच्या वेळेपर्यंत ईजिप्तमध्यें ३१ राजघराणीं होऊन गेलीं व त्यांचा इतिहास साधारण संगतवार सांपडला आहे. पहिल्या राजघराण्याचा संस्थापक मेनीस होता; यानेंच मिसर देशाचें एकीकरण केलें. ॲबिडॉस या गावीं या पहिल्या राजघराण्याचे अवशेष सांपडले आहेत. पुढील राजघराण्यांच्या कारकीर्दींत सुप्रसिद्ध मनोरे बांधण्यांत येऊं लागले. हे मनोरे म्हणजे राजांचीं कबरस्थानेंच होत. ईजिप्तमधील आज पहाण्यालायक पुतळा म्हणजे “ स्फिंक्स ” ( स्त्रीमुखी सिंह ) होय; पण हे स्फिंक्सचें देवालय वरील कांहीं मनोऱ्यांच्या वेशीवर महाद्वारासारखें बांधलेलें आहे. ख्रि. पू. १५०० पर्यंत एकंदर सतरा राजघराणीं होऊन गेलीं. प्रत्येक राजघराण्याच्या अमदानींत विशिष्ट शिल्पकामें होत व त्यांवरून त्या घराण्याचें आज स्मारक राहिलें आहे. अठराव्या घराण्यापासून ईजिप्तच्या नवीन साम्राज्यास आरंभ होतो; कारण या वेळीं देशांत मोठ्या जोराची

देशाभिमानाची लाट उसळून परकीय सत्तेविरुद्ध झगडण्याची पात्रता लोकांत आली व हिक्सॉस नांवाच्या सेमिटिक धनगर राजांना त्यांनीं हांकून लावलें ( सुमोरं खि. पू. १६०० ). यापुढें अत्यंत वैभवशाली अठरावें राजघराणें आलें.

सुमेरिया

जगाच्या इतिहासांत प्रथमच ज्या देशांत रानटी खेडवळ रहाणी टाकून शहरासारख्या सुधारलेल्या परिस्थितींत रहाणारे लोक आढळतात असा ईजिप्तखेरीज दुसरा देश म्हणजे सुमेरिया किंवा दक्षिण मेसापोटेमिया होय. त्या प्राचीन काळीं टायग्रीस आणी युफ्रेटीस या प्रसिद्ध नद्या एकमुखानें इराणी आखातांत पडत नव्हत्या. या नद्यांमधील दुआबांत सुमेरियन लोक शहरें वसवून रहात होते. हे सुमेरियन लोक चांगले साक्षर आणि कलासंपन्न होते. त्यांनीं उच्च दर्जाचें वाङ्मय संपादिलें व भौतिक शास्त्रांतहि बरीच प्रगति केली. त्यांचे ग्रंथ हल्लींप्रमाणें कागदांवर लिहिलेले नसून ( कारण त्या वेळीं आजच्या कागदाचा शोध नव्हता ), चिकणमातीच्या विटांवर खिळयांनीं खोदलेले होते. मिसरी लोकांप्रमाणें पापीरसनामक लव्हाळ्याच्या पत्रांवरहि ते लिहीत. त्या काळची लिपि म्हणजे वस्तूंचीं चित्रें काढणें. लेखनकला जरी नूतन पाषाण-युगापूर्वींची असली तरी लोकांत अक्षरलिपि रूढ होण्यास फार काळ लोटावा लागलेला दिसतो. सुमेरियांत ईजिप्त देशांतल्याप्रमाणें प्रत्यक्ष चित्रलिपि नव्हती तरी लिहिण्याच्या खुणा पाचरीच्या आकाराप्रमाणें दिसत; याचें कारण लिहिण्याची लेखणी विशिष्ट तऱ्हेची असल्यानें अशा पाचरी खुणा वठत. तेव्हां बाबिलोनी लिपीला कीलाकृति किंवा

पाचरीलिपि म्हणतात व मिसरी लिपीला चित्रलिपि किंवा भिक्षुकी-लिपि म्हणतात. पुढील सुधारलेल्या राष्ट्रांतील लिपी या दोन लिपींच्या संयेगासून तयार झालेल्या आहेत यांत शंका नाहीं. चीन जपान-सारख्या राष्ट्रांत अद्यापिहि चित्रलिपि जीव धरून आहे.

**बाबिलोनी संस्कृति**

गणित आणि ज्योतिषशास्त्रांत बाबिलोन फार पुढें गेले होतें हें, तेथील ग्रहांचे वेध, ग्रहणें वर्तविणें, वार्षिक पंचांग तयार करणें, द्वादशमानपद्धति, यंत्रें वगैरे गोष्टींवरून सहज सिद्ध होतें. सोनें, रुपें, तांबें, कांसें, रत्नें हीं बाबिलोन्यांना माहीत होतीं, एवढेंच नव्हे तर या वस्तू त्यांच्या अप्रतिम कलाकौशल्याचे विषयच होत. तेथें पारदर्शक कांचहि तयार होत असे. विणकाम आणि भरत-काम यांमध्यें येथील लोकांचा हातखंडा होता. सारांश, या बाबिलोनी लोकांस अठरा एकोणीसाव्या शतकांतल्या सुधारलेल्या लोकांइतकें सर्व गोष्टींचें ज्ञान होतें असें म्हणावयास दिक्कत वाटत नाहीं.

**बाबिलोनी राष्ट्रें व सेमेटिक वंश**

खि. पू. ५००० वर्षांपूर्वी बाबिलोनियांत एकच साम्राज्य नसून अनेक नगरराज्यें होतीं. प्रत्येक नगराचें स्वतंत्र राज्य असून त्यावर राजकीय आणि धार्मिक सत्ता त्या नगरांतील देवतेच्या पुजाऱ्याची असे. केंगी, किश, गिश्बन, शिर्पुर्ल, ऊर वगैरे नगरराज्यें इतिहासप्रसिद्ध आहेत. बाबिलोनियांत सुमेर आणि अक्कड हीं दोन अनुक्रमें दक्षिण आणि उत्तर प्रांतांतील मोठीं राजधानीचीं शहरें होतीं. या शहरांवरूनच त्या वेळच्या बाबिलोनी लोकांना सुमेरियन किंवा अक्काडियन म्हणण्यांत येतें. हे लोक सेमेटिक मात्र नव्हते. पण पुढें खि. पू. ५०००-४००० या

काळामध्यें केव्हां तरी अरबस्तानांतील सेमेटिक वीरांनीं बाबिलोनिया पादाक्रांत करून आपलीं राज्यें स्थापिलीं. तेव्हां यापुढचे बाबिलोनी लोक मात्र सेमेटिकवंशीय होत यांत शंका नाहीं.

**बाबिलोनी साम्राज्य-खम्मुरब्बीचें कोड**

या सेमेटिक बाबिलोनी लोकांमध्यें सार्गन नांवाचा एक सुप्रसिद्ध योद्धा होऊन गेला ( सुमार ख्रि. पू. २७५० ). त्यानें इराणी आखातापासून तों भूमध्यसमुद्रापर्यंतचा सर्व प्रदेश जिंकून एक मोठें साम्राज्य स्थापिलें. त्यानें आपल्या राज्यांत सुमेरी लिपि आणि भाषा सुरू केली व मूळच्या सुमेरी लोकांची संस्कृति जशीच्या तशी उचलण्याचा प्रयत्न केला. पण हें सार्गनचें साम्राज्य त्याच्यामागून सुमारें दोनशें वर्षांतच नष्ट होऊन एका नवीन सेमेटिक लोकांचें वर्चस्व सुमेरिया प्रांतावर बसलें. हे नवीन लोक अमोराईट होत. त्यांनीं बाबिलोन या त्या वेळीं अगदीं लहान असलेल्या गांवीं आपली राजधानी नेली. तेव्हां या वेळेपासूनच बाबिलोनी साम्राज्याचा खरा प्रारंभ झाला म्हणावयाचा. याच अमोराईट घराण्यांत जगप्रसिद्ध खम्मुरब्बी ( किंवा हम्मुरबी ) नांवाचा पहिला ऐतिहासिक स्मृतिकार ( कायदे करणारा ) होऊन गेला (सुमारें ख्रि. पू. २०००). त्याचें 'कोड' हें तत्कालीन बाबिलोनियाची एकंदर समाजरचना उत्तम रीतीनें दाखवितें. आधुनिक कायदेपद्धतीबरहुकूम न्यायदानाच्या आणि समाजसुव्यवस्थेच्या सर्व गोष्टी या कोडांत आढळतात. जमिनीची नीट विभागणी, कालवे, व्यापारास उत्तेजन, टपालखातें, धनी आणि नोकर यांमधील संबंध, कुटुंबांतील माणसांचे हक्क, मालमत्तेची विल्हेवाट या सर्वांविषयीं कायद्याचीं कलमें खम्मुरब्बीच्या

कोडांत मोठ्या मुत्सद्दीपणानें घातलेलीं आहेत व त्यांचेंच अनुकरण पुढील स्मृतिकारानीं केलेलें दिसतें. खम्मुरब्बीनतर खि. पू. १५०० पर्यंत बाबिलोनियांत तीन राजवंश होऊन गेले. असुरिया प्रांत प्रथम बाबिलोनी साम्राज्याच्या कक्षेंत होता. असुरचे मुख्य उपाध्यायच असुरियाचे राजे असत. निनेव्हे हें असुरियाचें राजधानीचें शहर खि. पू. ३००० सुमारासहि नांवाजलेलें आढळून येतें. तथापि खि. पू. १५००पर्यंत असुरियाचा इतिहास फारसा अवगत नाहीं.

ईजियन संस्कृति

मिसरी आणि बाबिलोनी संस्कृतीइतकीच महत्त्वाची ईजियन संस्कृति होय. युरोपियन संस्कृतीच्या मुळाशीं हीच संस्कृति असून क्रीट बेट हें या संस्कृतीचें केंद्र गणलें जातें. क्रीटमधील क्नोसस गांवीं सांपडलेल्या अवशेषांवरून या ईजियन संस्कृतीविषयीं अशी माहिती मिळते कीं, या भागांत कांहीं सुधारलेलीं स्वतंत्र राष्ट्रें होतीं. त्यांत सर्व कलांची पूर्ण वाढ झालेली होती. इतर लोकांचा फारसा उपद्रव नसल्यानें ईजियन लोक लवकरच रानटी अवस्थेंतून वर निघून मिसरी, असुरी वगैरे राष्ट्रांशीं दळणवळण ठेवूं लागले. खि. पू. २५०० सुमारास क्रीट हें सुधारणेच्या कळसास पोहोंचलेलें दिसतें. क्रीटच्या सम्राटाला मायनास म्हणत. त्याच्या राजवाड्यांत पाणी खेळवलेलें असून स्नानगृहें, मेजें, आसनें, नृत्यागारें वगैरे तत्कालीन कोणत्याहि राष्ट्रांत न सांपडणाऱ्या सुखसोयी होत्या. खेळांचे सामने, बैलांच्या झुंझा, मुष्टियुद्धें, द्वंद्वयुद्धें, नाच वगैरे करमणुकीचे प्रकार चालू होते. भाजलेल्या मातींचीं चित्रें करणें, भांड्यांवर चित्रें रंगविणें, जडावाचें काम सुबक उठविणें, पूल बांधणें, सुंदर कपडे बनविणें वगैरे गोष्टींत ईजियनांचा

हातखंडा असे. यांची लिहिण्याची लिपिहि अगदीं वेगळीच होती. लोक सृष्ट वस्तूंची उपासना करीत. राजा हाच त्यांचा धर्मगुरु असे. शहरांना तटबंदी आढळत नसल्यानें त्या वेळीं या राष्ट्रांत बरीच शांतता होतीसें दिसतें. पुढें फोनिशियन आणि ग्रीक लोकांची सत्ता भूमध्यसमुद्रावर बसत चालल्यावर क्रोसस शहराला तटबंदी करण्यांत आली. खि. पू. १५०० च्या सुमारास क्रीटवर रानटी लोकांनीं स्वारी करून ईजियन संस्कृतीचा ऱ्हास करण्यास प्रारंभ केला.

**आर्यवंश व मूळची आर्यांची रहाणी**

मिसरी, असुरी आणि ईजियन संस्कृतींचा नाश घडवून आणणारे लोक म्हणजे प्रमुखत्वानें आर्य होत. हे आर्य लोक मूळ जगाच्या कोणत्या भागांतून आले, यासंबंधीं अद्याप एकमत नाहीं. मध्य आणि आग्नेय युरोप, मध्य आशिया, आणि उत्तर ध्रुव अशा तीन भागांपैकीं कोठल्यातरी एकावर आर्य लोक मूळ रहात होते. हे मूळचे आर्य स्थायिक वृत्तीचे नसून एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं भटकत जात. त्यांच्या बरोबर गुरेंढोरें असून हल्लींच्या वड्डार लोकांप्रमाणें त्यांची रहाणी असे. ते शेती करीत तरी एकाच शेतवाडीवर फार दिवस रहात नसत. पीक काढलें कीं चालले पुढें. त्यांचे पुढारी भिक्षुकवर्गांतील नसत तर धाडसी योद्ध्यांपैकीं असत. कांहीं कुटुंबांकडे वंशपरंपरा पुढारीपण चाले. पुढाऱ्यांच्या दारीं त्यांचे अनुयायी रात्रंदिवस पडलेले असत. मेजवान्या, गाणें, करमणुकीचे खेळ, विचारविनियम इत्यादि सर्व गोष्टी पुढाऱ्यांच्या घरीं बसून होत. या आर्य लोकांच्या बऱ्याच शाखा होत्या व प्रत्येक शाखेचा वेदांप्रमाणें परंपरागत इतिहास सांपडतो.

आर्यांचा विस्तार

आर्य लोक कोठकोठें भटकत जाऊन वसाहती करून राहिले याची कांहीं माहिती भाषाशास्त्रावरून कळते. एके काळीं सध्यांचे युरोपियन, इस्लामी धर्माचे नसणारे इराणी आणि हिंदु यांचे पूर्वज एकाच ठिकाणीं, एकाच चालीरीतींचे आणि एकाच संस्कृतीचे असत. आजच्या जगांतील बऱ्याच भाषांमध्यें जें सादृश्य दिसतें तें याच कारणामुळें आलें. पुढें या मूलगृहकालच्या आर्यांची एक शाखा पश्चिमेकडे युरोपांत गेली व दुसरी पूर्वेकडे इराणच्या प्रदेशांत आली. इराणांतील आर्यांची एक शाखा आणखी पूर्वेकडे जात जात पंजाबांत येऊन राहिली. याच शाखेचे आर्य आजच्या हिंदूंचे पूर्वज होत. यावरून युरोपियन, इराणी-पारशी व आपण हिंदू एकाच मानव वंशाचे आहोंत हें स्पट दिसून येईल.

पारशी आर्य व त्यांचा धर्म

इराणांतच वसाहत करून राहिलेल्या आर्यांचे वंशज सध्यांचे पारशी लोक होत असें सांगितल्यास आश्चर्य वाटेल. या पारशांचे व आपणां हिंदूंचे पूर्वज एके काळीं एकत्र नांदत होते. याचें प्रत्यंतर पारशांच्या धर्मग्रंथाच्या—अवेस्ताच्या भार्षेत आणि आपल्या संस्कृत भार्षेत असणाऱ्या घटनासाम्यांत पहावयास मिळतें. पारशी अग्नीचे उपासक आहेत, तसे आपले वैदिक पूर्वजहि होते. युरोपकडे गेलेले आर्य—ग्रीक, रोमन, सॅक्सन वगैरे—जसे पूर्वेकडच्या आर्यांपासून सर्व बाबतींत कालांतरानें वेगळे होत गेले, तशीच इराणी आणि भारतीय आर्यांची फारकत घडून आली. इराणांत झरथुष्ट्र धर्म स्थापन झाला तर हिंदुस्थानांत वैदिक धर्माचा प्रसार झाला.

खि. पू. १५०० च्या पूर्वींचा इराणचा इतिहास उपलब्ध नाहीं.

**प्राचीन पर्शु किंवा इराण देश**

इराणांतील पर्शु आणि हिंदुस्थानांतील भारतीय यांचे संबंध बरेच दृढ होते, याचे पुरावे या काळांत सांपडतील. या वेळीं पृथू, पर्शु, मग आणि मीड या जाती इराणांत असून पश्चिमेकडे इराण्यांनीं आक्रमण चालविलेलें दिसून येतें. साधारणतः खि. पू. ९ व्या शतकापासून इराणच्या प्रत्यक्ष इतिहासास आरंभ होतो. या कालापूर्वींचा इतिहास अज्ञात आहे.

**हिंदुस्थानांत आर्यांची वसाहत, प्राचीन भारतीय संस्कृति**

हिंदुस्थानांत आर्य शिरण्यापूर्वीं तेथें मूळ वस्ती करून राहिलेले बरेच निरनिराळे लोक होते. त्यांपैकीं प्रमुख म्हणजे द्रवीड लोक होत. हे द्रवीड बरेच सुधारलेले असून त्यांनीं बहुतेक हिंदुस्थान व्यापला होता. पण आर्य लोक जास्त कणखर व हुषार असल्यानें त्यांनीं थोड्याच काळांत द्रवीड लोकांना मागें मागें हटवीत आपण उत्तर हिंदुस्थानचे मालक बनले. या काळच्या आर्यांचे प्रत्यक्ष अवशेष कांहीं नसले तरी त्यांच्या अवशिष्ट वेदादि वाङ्मयावरून त्यांच्या संस्कृतीची बरीच कल्पना येते. आर्यांच्या वैदिक ग्रंथांपैकीं प्रमुख ऋग्वेद होय. याचा काल खि. पू. ४०००—५००० वर्षांइतका असावा. वेदकालीन भारतीय आर्य सर्व विद्या आणि कला यांत प्रवीण होते. ते चांगलेच लढवय्ये असून जिंकलेल्या प्रदेशांवर राज्य करण्याची पात्रताहि त्यांच्या ठिकाणीं होती. त्यांच्यांत मोठे गणिती, ज्योतिषी, वेदांती आणि कवीहि अनेक होऊन गेले. व्यापार, उद्योगधंदे आणि आंतरराष्ट्रीय दळण-वळण या गोष्टींतहि ते मुळींच मागें नव्हते. त्यांचा पहिला आदर्शभूत

आणि परमपूज्य राजा म्हणजे रामचंद्र होय. त्याचा काल ख्रि. पू. २५०० धरतात. या रामचंद्राचें चरित्र ज्यांत गोंविलें आहे तो रामायण ग्रंथ आपणां हिंदूंना फार पूज्य वाटत असून थोर धर्मग्रंथांमध्यें ह्या महाकाव्याला उच्च स्थान दिलें जातें. दुसरें हिंदूंचें धार्मिक महाकाव्य महाभारत होय. याच्या सुमारें पन्नास हजार ओळी (चरणें) आहेत. यांत कौरव आणि पांडव यांच्यामधील घडलेल्या प्रचंड युद्धाचा हृदयंगम इतिहास दिला आहे. भारतीय तत्त्वज्ञानाचें सार जी भगवद्गीता तीहि या भारत ग्रंथांतीलच एक लहान भाग आहे. भारतीय युद्धाचा काल ख्रि. पू. १५०० इतका मानण्यांत येतो. तेव्हा या काळची भारतीय आर्यांची उच्च संस्कृति या महाभारत काव्यावरून प्रतीत होते. भारत कालीं शेतकी आणि व्यापार वाढून इतर तदनुषंगिक धंद्यांना चांगलें उत्तेजन मिळालें. खनिज पदार्थांचा बराच उपयोग मनुष्याच्या सुखसोयींकडे होऊं लागला. शरीरमंडनाकडे समाजाची बरीच दृष्टि वळलेली दिसते; कारण अलंकार आणि मौल्यवान् वस्त्रें यांचे उल्लेख भारतांत जागजागीं आढळतात. स्त्रियांचा दर्जा मात्र वैदिक कालाहून खालीं उतरलेला आहे. पुरुषापेक्षां स्त्रीला कमी मानण्यांत येऊं लागून पुरुषांच्या सौख्यासाठीं स्त्रियांचें जीवित आहे असा सार्वत्रिक उपदेश होऊं लागला. धर्माच्या क्षेत्रांत मात्र मोठीच भर पडली. नवीन देव व त्यांचे अवतार शिरले, आणि सोपा धर्माचार जाऊन त्या ठिकाणीं यज्ञासारखें मोठें अवडंबर माजलें. तथापि पांडित्यांत भरच पडत गेली यांत शंका नाहीं. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हें चातुर्वर्ण्य मात्र कायम झालें आणि त्यावेळेपासून वर्णावर्णांत कलह होण्यास प्रारंभ झाला

तो आजतागायत कायम व वाढता आहे. तथापि हें निःसंशय कीं, या चातुर्वर्ण्यानें हिंदुसमाजाची त्या वेळीं जी उत्कृष्ट घडी बसविली ती इतक्या शतकांनंतरहि फारशी बिघडलेली नाहीं.

---

## प्रकरण ३ रें

## आणखी सांस्कृतिक राष्ट्रें

जगांतील आणखी एक अत्यंत जुनें राष्ट्र म्हणजे चीनचें होय.

**चीन व त्याची संस्कृति**

पशूंच्या अवस्थेंतून चिनी लोकांना बाहेर काढणारा चीनचा बादशहा फुही नांवाचा असून तो खि. पू. २८५२-२७३८ या काळांत होऊन गेला असें म्हणतात. या फुहीनें लोकांना शिकार करण्यास, मासे धरण्यास व शेळयामेंढया राखण्यासहि शिकविलें. त्यानें घालून दिलेली चित्रलिपि अद्याप चालू आहे. फुहीप्रमाणें शान-नुंग बादशहानें लोकांना मानवी संस्कृतीचे पुढील धडे दिले. शेतकी व वैद्यकी या दोन उपयुक्त गोष्टी त्यानें शिकविल्या. तिसरा संस्कृतिशिक्षक बादशहा हुआंगती होय. यानें चीनचें साम्राज्य वाढविलें. वाहनें सर्वत्र सुरू केलीं. संगीत कलेस पावा वाद्याच्या शोध लावून चांगलें उत्तेजन दिलें. त्यानें तयार करविलेल्या पंचांगांत अधिक महिना आहे. रेशमाच्या किड्यांची जोपासना करण्याचा उद्योग त्याच्याच कारकीर्दींत निघाला. यापुढें चीनच्या प्रत्यक्ष इतिहासास सुरुवात होते. खि. पू. १५०० च्या सुमारास चीनवर शांग ऊर्फ यिन घराण्याचा अंमल होता. इ. स. १९११ मध्यें प्रजासत्ताक

राज्यपद्धति निर्माण होईपर्यंत चीनवर अनेक राजघराणीं राज्य करून गेलीं. तथापि सांस्कृतिक दृष्टीनें चीन अद्यापि फारसें सुधारलेलें दिसत नाहीं.

मयसंस्कृति

अमेरिकेंतहि मेक्सिको संस्थानांत मय नांवाची एक जुनी संस्कृति सांपडते. पण ती मिसरी, असुरी, किंवा भारतीय संस्कृतीइतकी सुधारलेली मुळींच नव्हती. शिवाय तिचा समग्र सुसंगत इतिहास आढळत नाहीं.

युरोपांतले आर्य

आतां आर्य लोकांची एक शाखा पश्चिमेकडे युरोपांत जी पसरली तिची हकीकत पाहूं. पश्चिममार्गी आर्यलोक फ्रान्स, स्पेन आणि ब्रिटनपर्यंत जाऊन राहिले. हेच लोक केल्ट किंवा ब्रिटन या नांवानें ओळखिले जातात. इटालियन टोळीहि आर्यच होय. आसुरी, बाबिलोनी साम्राज्याला मोठा धक्का देऊन ईजियन शहरें उध्वस्त करणारे फ्रिजिअन आणि ग्रीक लोक पश्चिमेकडे गेलेल्या या आर्यकुळांतीलच होते. आतां यापुढील जगाचा इतिहास आर्य लोकांच्या दिग्विजयांनीं भरलेला आढळून येईल.

ग्रीक साम्राज्य

या दिग्विजयी आर्यांत ग्रीक आणि रोमन हीं दोनच राष्ट्रें फार प्रामुख्यानें पुढें आलीं व आजच्या युरोपियन राष्ट्रांत ग्रीक-रोमन रक्तांचा आनुवंशिक संबंध उघड दिसून येईल. ग्रीसचा—ग्रीक राष्ट्राचा—इतिहास हा एकटयादुकटया देशाचा लहान इतिहास नसून १५० हून अधिक संस्थानांचा तो राजकीय इतिहास आहे. पूर्वपश्चिम कॉकेशस ते पिरनीज, आणि उत्तरदक्षिण दक्षिण रशिया ते आफ्रिकेच्या मध्यापर्यंत ग्रीक वसाहती नांदत होत्या.

प्राचीन काळीं म्हणजे सुमारें ख्रि. पू. ३ ऱ्या शतकांत ग्रीक लोक साधारण रानटी अवस्थेंतच होते. त्यांना लोखंड माहीत नव्हतें कीं लिहिणेंवाचणें येत नव्हतें. त्यांनीं ईजियन शहरांवरून नांगर फिरविल्यानंतर त्याच शहरांभोंवतीं खोपटयांतून ते राहूं लागले. नंतर त्यांच्या डोक्यांत तटबंदी शहरें बांधण्याची कल्पना आली. नंतर ते व्यापारहि करूं लागले. अथेन्स, स्पार्टा, कॉरिंथ, थेबीज वगैरे ग्रीक शहरसंस्थानें सुप्रसिद्ध आहेत. लोकसत्तात्मक राज्यपद्धतीचा पाया याच संस्थानांनीं प्रथम घालून दिला असें म्हणण्यास हरकत नाहीं. ईलियड आणि ओडिसे हीं दोन ग्रीक महाकाव्यें आपल्याकडील रामायणमहाभारतांप्रमाणें जगद्वंद्य ठरलीं आहेत. हीं होमरनें रचिलेली महाकाव्यें आशियामायनरवर ग्रीकांचें वर्चस्व कसें बसलें याचा गोष्टीरूप इतिहासच होत. ग्रीक लोक विद्येंत बरेच पुढें होते. यूरोपखंडांतील पहिले तत्त्वज्ञानी ग्रीक राष्ट्रांतच होऊन गेले. ही तत्त्वज्ञान्यांची परंपरा ग्रीक राष्ट्र नष्ट होईपर्यंत अव्याहत चालू होती.

**रोमन साम्राज्य**

आर्यांची दुसरी एक शाखा जी इटलींत जाऊन राहिली, तिनें रोम शहरावरून आपणांला रोमन म्हणवून घेतलें व आपल्या संस्कृतीचें केंद्र रोम शहर केलें. रोमन संस्कृति बहुंशीं ग्रीक संस्कृतीचें भावंड म्हणतां येईल व रोमचा प्राथमिक इतिहास हा लोकशाहीच्या झगड्याचा इतिहास म्हणतां येईल. एकीकडे सरदार-दरकदारांचा वर्ग आणि दुसरीकडे सामान्य लोकांचा वर्ग असे दोन तट असून जुन्या सरदार घराण्यांकडे असलेली राजसत्ता काढून घेण्याचा सामान्य जनतेचा दीर्घ प्रयत्न शेवटीं यशस्वी होऊन

लोकशाहीची स्थापना झाली. पुढें रोमची सत्ता बरीच वाढत जाऊन एक मोठें साम्राज्य बनण्याइतका त्याचा अंमल वाढला. या रोमन राष्ट्रांत मोठे योद्धे, तत्त्वज्ञानी आणि पंडित होऊन गेले.

**तत्कालीन इतर राष्ट्रें : हिटाईट आणि मिटनी**

या काळचीं आणखी संस्मरणीय प्राचीन राष्ट्रें म्हणजे आशियाखंडाच्या अगदीं पश्चिमेकडील हिटाईट, मिटनी, हीब्रू, फिनिशिअन वगैरे होत. हिटाईट लोकांनीं खि. पू. १६ व्या शतकांत आशियामायनरमध्यें एक मोठें बलिष्ठ राज्य स्थापन केलें. त्यांचा पहिला प्रसिद्ध राजा खत्तुशील नांवाचा होता. हिटाईट साम्राज्य पुढें वाढत गेलें. ईजिप्त आणि असुरी साम्राज्यांशीं तें टकरा खाऊं लागलें व खि. पू. सातव्या शतकांत तें नामशेषहि होऊन गेलें. मिटनी आणि हीब्रू राष्ट्रें हीं हिटाईटचीं दोस्त राष्ट्रें होतीं. हिटाईटप्रमाणेंच मिटनी लोकांनींहि बरे दिवस पाहिले होते. त्यांनीं देखील मिसरी आणि असुरी साम्राज्यांशीं दीर्घ वैर पत्करून वीराचें मरण संपादिलें. तिसऱ्या असुर-नाझिर-पालनें मिटनी देश असुरी साम्राज्यास जोडला. हीब्रू राष्ट्राची जन्मभूमि पॅलेस्टाईन होय. या पॅलेस्टाईन प्रांतांत यहुदी, खिस्ती आणि महंमदी या तीन सेमेटिक धर्मांचा उदय झाला व त्यांनीं आज सर्व जग व्यापिलें आहे.

---

## प्रकरण ४ थें

# सेमेटिक संस्कृति व तिचा जगभर विस्तार

जगाच्या इतिहासांत मागील आर्य लोकांप्रमाणेंच सेमेटिक लोकांनीं मोठी कर्तबगारी दाखविलेली आहे. ज्यू किंवा हीब्रू हें सेमेटिक राष्ट्र ज्यूडियामध्यें खि. पू. १००० सालांपूर्वींच स्थायिक झालें होतें. ज्यू लोकांचा मूळ पुरुष जो आब्राहाम तो बाबिलोनचा सुप्रसिद्ध राजा खम्मुरब्बी याचा समकालीन असावा. आब्राहाम व त्याचे वंशज मिसर देशांतून भटकून येऊन खनान प्रांतांत पुन्हां कसे येऊन राहिले, याचा गोष्टीरूप इतिहास जुन्या करारांत सविस्तर दिला आहे. खनान देशांत सुद्धां त्यांना फिलिस्टाईन लोकांशीं बराच काळ स्वामित्वासाठीं झगडावें लागलें. त्यांच्यांतील सॉलोमन राजा फार शूर व शहाणा होऊन गेला. त्यानें हीब्रू साम्राज्याचा विस्तार करून व्यापारहि वाढविला.

**हीब्रू राष्ट्र**

सॉलोमननंतर हीब्रू राष्ट्र खंगत चाललें. वरून असुरी व खाल्डन मिसरी साम्राज्यांचे जोरानें तडाके बसूं लागले. पुढें इराणनें असुरी-बाबिलोनी साम्राज्यें बुडविल्यानंतरहि खि. पू. ८०० ते खि. पू. ३०० या पांच शतकांत ज्यू लोकांना फारसें डोकें वर काढतां आलें नाहीं. इतर सेमाईट लोकांप्रमाणें ते नामशेष झाले नाहींत इतकेंच. या ज्यूंनीं जेव्हां बायबल रचून जगाला नैतिक आणि धार्मिक उपदेश करण्याचें काम हातीं घेतलें तेव्हां-पासूनच त्यांचा लौकिक वाढला. युरोपियनांचा बायबल हा जो सर्वमान्य

**ज्यू लोक व खिस्ती धर्माचा उदय**

धार्मिक ग्रंथ आहे त्याचे मोठाले दोन भाग पडतात: एक हीब्रू लोकांचा जुना करार व दुसरा येशू ख्रिस्ताचा नवा करार. येशू हा ज्यू लोकांतीलच एक साधु पुरुष असून त्यानें जो नवीन धर्म स्थापिला त्याला ख्रिस्ती धर्म म्हणतात. ज्यू लोकांचा मूळचा धर्म इतर सेमाईट-प्रमाणेंच अगदीं देवघेवीचा व्यावहारिक स्वरूपाचा होता. पुढें त्यांच्यांत थोर थोर प्रवक्ते–उपदेशक निघून त्यांनीं त्यांत उच्च प्रकारच्या भावना आणि नैतिक कल्पना घातल्या. ईश्वर नुसता नवसांनीं किंवा स्तवनांनीं वश होत नसतो; आपले शुद्ध आचार-विचार व सत्यनिष्ठा त्याला पाहिजे असते. दया, क्षमा, प्रेम आणि स्वार्थत्याग या गुणांना तो विशेष चाहतो. या उपदेशांचा यहुदी-लोकांवर चांगला परिणाम होऊन त्यांची धर्मश्रद्धा पुढील अनंरत संकटपरंपरेंत सुद्धां टिकून राहिली. यहुद्यांचे धर्मग्रंथ हे श्रेष्ठ वाङ्मय म्हणूनहि गणले जातात. अशा रीतीनें यहुद्यांनीं जगाच्या इतिहासांत बरीच सांस्कृतिक भर टाकली आहे.

**ख्रिस्ती धर्माचें साम्राज्य**

जगावर मोठा प्रभाव गाजविणारा सेमेटिक संस्कृतीचा दुसरा घटक म्हणजे ख्रिस्ती धर्म. आज एकंदर सर्व धर्मीयांत ख्रिस्ती धर्मीयांची संख्या जवळजवळ एक तृतीयांश आहे. इतकी मोठी संख्या दुसऱ्या कोणत्याहि धर्मांत नाहीं. अशा जगद्व्यापक धर्माचा संस्थापक जो येशू तो अगदीं साधा माणूस होता. त्याचें घराणें मोठें नव्हतें किंवा त्याचें शिक्षणहि फार नव्हतें. पण हीब्रू प्रवक्त्यांनीं अंतर्बाह्य शुद्धीचा जो उपदेश अविश्रांत चालवून लोकांत उच्च धार्मिक कल्पना रूढ केल्या तोच पवित्रता

राखण्याचा उपदेश येशूनें पुढें चालविला होता. तो वेदांतासारख्या गहन विषयांत शिरत नसे तर अगदीं अडाणी माणसालाहि कळेल व पटेल अशा रीतीनें शिकवीत असे. परमेश्वर सर्व ठिकाणीं आहे, त्याचें प्रेम सर्वांवर सारखेंच आहे, तो दयाशील व न्यायी आहे, अशा-सारखा त्याचा साधा उपदेश असे. मनुष्याला आपल्या कृतकर्मांचा पश्चात्ताप झाला कीं, तो शुद्ध झाला असें सांगण्यानें पापी लोकांना आपण पुन्हां चांगलें होऊं शकूं अशी आशा वाटूं लागते. येशूनें विश्वावर राज्य केलें नसून लोकांच्या अंतःकरणावर राज्य केलें असें जें खिस्ती धर्मीय म्हणतात त्यांत बरेंच तथ्य आहे. असो. येशूनें १८ महिनेच उपदेश करून जुन्या धर्माचे बरेच अनुयायी आपल्या बाजूला ओढल्यामुळें भिक्षुकवर्ग त्याच्यावर संतापला व रोमन राज्यकर्त्यांकडे त्याच्या विरुद्ध गाऱ्हाणीं नेऊन त्यानें त्याला देहांत शिक्षा देवविली. पण खिस्ताच्या मृत्यूनंतर सबंध रोमन साम्राज्यांत खिस्ती धर्मच सुरू झाला व पुढें फार झपाट्यानें सबंध युरोपखंडहि खिस्ती बनलें.

सेमेटिक महावंशांतील तिसरा मोठा घटक म्हणजे इस्लामी संस्कृति.

**इस्लामी संस्कृति**

खिस्ती धर्म-संस्कृतीप्रमाणें इस्लामी धर्म-संस्कृतीनेंहि जगांत मोठें परिवर्तन घडवून आणिलें. या धर्माचा संस्थापक महंमद पैगंबर हा बेदोइन या अरब जातींत जन्मला (इ. स. ५७०). त्याचे लोक इतर तत्कालीन सर्व लोकांप्रमाणेंच सृष्टींतील पदार्थांची देव म्हणून पूजा करीत. महंमदानें खिस्ती धर्मांतील उच्च प्रकार पाहून आपल्या धर्मांतहि सुधारणा करावी असा बेत केला. खिस्ताच्या देशबांधवांप्रमाणेंच महंमदाचे देश-

बांधवहि त्याला पाखंडी असें समजून त्याचा छळ करीत असत. तो मेदिना येथें रहात असे. तेथून तो मक्केला जाऊन 'एकाच खऱ्या देवा'विषयीं लोकांना शिकवण देऊं लागला. मूर्तिपूजेविरुद्ध असलेले बरेच लोक त्याचे शिष्य बनले व त्याचा एक संप्रदाय तयार झाला. आपण देवदूत असून धर्माला इष्ट वळण लावण्यासाठीं परमेश्वरानें आपणांला पाठविलें आहे असें तो सांगत असे. आपला धर्म तरवारीच्या बळावर पसरवावा असेंहि तो अनुयायांना प्रोत्साहन देई. त्यामुळें लवकरच बेदोइन अरब धर्मप्रसारासाठीं बाहेर पडले. स्पेनपासून पूर्वेस चीनपर्यंत त्यांनीं आपलें राज्य, धर्म आणि संस्कृति रुजविण्याचें कार्य केलें. महंमदी धर्मानें जगांत मोठी क्रांति घडवून आणली यांत संशय नाहीं. आशिया आणि आफ्रिका खंडांत तर या धर्माचें विशेष वर्चस्व आहे.

**व्यावहारिक धर्म**

महंमदाचा धर्म मुसलमानांना राजकीय दृष्ट्या फार उपयोगी पडला. धैर्याला तो फार महत्त्व देत असे. विरक्तवृत्ति किंवा संन्यासधर्म त्यानें मुळींच उपदेशिला नाहीं. परधर्मीयांशीं नुसती स्नेहाचीच वृत्ति ठेवूं नये तर त्यांना स्वधर्मांत घेण्याची खटपट करावी अशी महंमदी आज्ञा कुराणांतून कोठेंकोठें जी आढळते तीसुद्धां महंमदी साम्राज्याच्या वाढीला कारणीभूत झाली असेल.

ख्रिस्ती संप्रदाय ज्याप्रमाणें रोमन साम्राज्यानें आपल्या प्रगतीकरितां अंगिकारून प्रतिष्ठेस चढविला त्याचप्रमाणें महंमदी धर्मांतील खलीफतींनीं इस्लामी धर्माची ध्वजा सर्व जुन्या जगावर फडकविली होती. खलीफ म्हणजे धार्मिक आणि व्यावहारिक बाबींतला प्रमाणपुरुष—

सर्वसत्ताधारी व सर्वश्रेष्ठ व्यक्ति. खलीफाच्या राज्याला खलीफत म्हणतात. अशा खलीफती अरबस्तान, स्पेन, ईजिप्त आणि तुर्कस्तान या देशांत होऊन गेल्या. आज तुर्कस्तानांतून खलीफाची गादी फेंकून देऊन नामशेष करण्यांत आली आहे. तथापि मागें खलीफांनीं बरेच दिग्विजय गाजवून इस्लामी धर्म जगांत पूर्ण रुजविला व त्याला राज्य-सत्ता प्राप्त करून दिली.

सेमेटिक धर्मांची जगाला शिकवण

याप्रमाणें सेमेटिक संस्कृतीचा जगज्जेता इतिहास आहे. या संस्कृतीनें जगाला व्यावहारिक उपासनापद्धतीचा लाभ करून देऊन लोकांचा एकत्र कार्यशील होईल असा संग्रह करण्याचा धडा घालून दिला यांत संशय नाहीं. तसेंच राजकीय ध्येयें ठरविण्याच्या कामींहि तिनें मोठी कामगिरी केली आहे.

---

## प्रकरण ५ वें

# मध्ययुगीन संस्कृति

### पूर्वार्ध

मीडियाचें साम्राज्य व इराणचा पुढील इतिहास

मागील प्रकरणांतील सेमेटिक संस्कृतीच्या अनुरोधानें आपण काल दृष्ट्या फार पुढें गेलों. तेव्हां पुन्हां मागें जाऊन इराणी, ग्रीक, रोमन वगैरे साम्राज्यांची स्थिति पहावी लागेल. इराणवर झरथुष्ट्री धर्माचा पगडा बसल्यानंतरचा इतिहास म्हणजे मीड लोकांचें त्यावर वर्चस्व ( खि. पू. ६०० च्या पूर्वी ). पर्शु किंवा पारशी लोक याच मीड लोकांचे दास म्हणून राहिले. मीडिया साम्राज्याचा संस्थापक डायोसीस यानें

व याच्या मुलांनातवांनीं देश जिंकण्याचें कार्य उरकलें आणि पश्चिम आशियाखंडांत एक बलिष्ठ सत्ता निर्माण केली. पण पुढें अकिमेनीड घराण्याचें प्राबल्य होऊन मीडिया परतंत्र झाला. या अकिमेनीड घराण्याचा पहिला राजा सायरस यानें इराणी साम्राज्याचें वर्चस्व भूमध्यसमुद्रापर्यंत नेऊन बाबिलोन, खाल्डियन राज्य, सीरिया, पॅले-स्टाईन इत्यादि सर्व राज्यें अंकित करून सोडिलीं. पूर्वेकडे आजचा अफगाणिस्तान देशहि त्याच्या हातांत होता. सायरस हा मोठा उदार व सद्गुणी म्हणून प्रसिद्ध आहे. सायरसनंतर सुमारें तीनशें वर्षें त्याचें साम्राज्य टिकलें. त्याच्या घराण्यांत डरायस ( पहिला ) हाहि मोठा राजा होऊन गेला. डरायस हा धार्मिक असे. अहूरमझ्द ( पारशांचा मुख्य देव ) यानें आपणांस जगावर राज्य करण्यास पाठविलें असून आपल्या अधिकारांतील सर्व राष्ट्रांवर न्यायानें राज्य केलें पाहिजे असें तो समजे व वागेहि. डरायसनेंच प्रथम हिंदुस्थानवर हल्ला करून पंजाब हा आपल्या राज्याचा सुभा केला. त्याची राज्यव्यवस्था फार उत्कृष्ट असे. आपल्या राज्याचे त्यानें पंचवीस ‘ क्षत्रपी ’ ( प्रांत ) करून त्यांवर एकेक गव्हर्नर ‘ क्षत्रप ’ नेमला होता. आजच्या प्रांता-धिकाऱ्याप्रमाणें क्षत्रपाला सर्व अधिकार असत. लष्करी बंदोबस्ताचा अधिकार मात्र राजाकडे असे. राज्यकारभार चालविण्यासाठीं एक मंत्रिमंडळहि बनविलेलें होतें. सम्राट्, क्षत्रप व अंकित राजे हे आप-आपलीं सोन्यारुप्यांचीं नाणीं पाडीत. कर किंवा खंडणी भरणें झाल्यास ती पैशाखेरीज घोडे, गुरें, धान्य वगैरे रूपांनींहि भरल्यास चालत असे. सरकारी डाकेची देखील सोयिस्कर तजवीज केली होती.

डरायसच्या अमदानींत युरोपांत ग्रीक साम्राज्य भरभराटलें होतें.

**डरायसची ग्रीसवर स्वारी**

डरायसनें फिनिशिअन आरमाराच्या मदतीनें एकामागून एक ग्रीक बेटें काबीज करून अथेन्सला शह दिला. पण अथेन्सच्या लोकांनीं स्पार्टाच्या मदतीनें मॅरेथॉन येथें इराणी सैन्याचा मोठा पराभव करून त्याला परत हांकून लाविलें (ख्रि. पू. ४९०). ही इराण्यांची ग्रीसवर पहिली स्वारी होय. स्पार्टाला मदतीकरितां बोलावण्यास निघालेला जासूद दोन दिवसांच्या आंतच शंभरांवर मैलांचा मोठा अवघड रस्ता चालून गेला. म्हणून हल्लीं जी पळण्याची शर्यत यूरोपांत दरसाल होते तिला ‘ मॅरेथॉन रेस ’ म्हणतात.

या पराभवानंतर लवकरच डरायस हाय घेऊन मृत्यु पावला. पण ग्रीस जिंकण्याची मोहीम मात्र पुढें बंद पडली नाहीं. त्याचा मुलगा झर्कझीज यानें सबंध चार वर्षे अहोरात्र तयारी करून प्रचंड सैन्य आणि आरमार सिद्ध केलें. थर्मापिलीच्या खिंडींत थोड्याशा स्पार्टन सैन्यानें अतुल पराक्रम दाखविला असतांनाहि त्याचा उपयोग न होऊन इराण्यांचा जय झाला व ग्रीस इराणी साम्राज्याखालीं आल्यासारखें थोडे दिवस वाटलें. पण लवकरच एका लहानशा ग्रीक आरमारानें इराणी सैन्याचा कोंडमारा करून त्याला शरण येण्यास भाग पाडिलें व आशियांतील ग्रीक राष्ट्रांना स्वातंत्र्य मिळवून दिलें. यापुढें पराक्रमांत इराणचें नांव ऐकूं येणार नाहीं. युरोपांतील नेपोलियनप्रमाणें डरायसची कारकीर्द होती. त्याचें ऐश्वर्य फार थोड्या सम्राटांना लाभलें असेल.

ग्रीक संस्थानांतून नेहेमीं भांडणें असत. कोणतें तरी एक संस्थान प्रमुख होऊन बाकीच्या संस्थानांना ताब्यांत ठेवूं पाही. अथेन्स संस्थानच सर्वांत श्रेष्ठ गणलें जात असून त्याची संस्कृति ती सर्व ग्रीसची संस्कृति म्हणण्यास हरकत नाहीं. अथेन्सच्या खालोखाल स्पार्टा असून या दोघांत मोठी चुरस असे. तथापि कांहीं वेळां हीं दोन्ही राज्यें एक होऊन परकीय शत्रूचा पाडाव करीत. याचें मोठें उदाहरण म्हणजे डरायस व त्याचा मुलगा यांच्या स्वाऱ्यांच्या वेळचा पराभव. तथापि अशीं उदाहरणें फार कमी. एकदां तर स्पार्टानें इराणची मदत घेऊन अथेन्सच्या साम्राज्याला नामोहरम करून आपण इराणचें मांडलिकत्व पत्करिलें होतें! वर सांगितल्याप्रमाणें इराणी वर्चस्व झुगारून दिल्यानंतर सर्व ग्रीक संस्थानें संघटित—अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांप्रमाणें—करण्याचा प्रयत्न झाला. पण उलट एखाद्या संस्थानचेंच साम्राज्य होऊं लागलें. अथेनिअन साम्राज्याचा ग्रीसवर अंमल असतांना लोकशाहींत साम्राज्यशाही घुसविण्याचा डाव पेरिक्लीजसारखा राजकार्यधुरंधर खेळत असलेला दिसतो. म्हणजे अथेनियन लोकांपुरते निराळे सवलतींचे कायदे व बाकीच्या प्रजाजनांना बिगरहक्काचे कायदे; जसें: मतदानाचा हक्क फक्त अथेनिअन कुळांत जन्मलेल्या लोकांनाच असावयाचा, शिक्षणाच्या बाबतींतहि असाच फरक. अथेन्सच्या साम्राज्यानंतर स्पार्टाचें साम्राज्य झालें. तें बरेंच विस्तृत असून सर्व ग्रीसभर पसरलें होतें; पण त्याची समुद्रावर विशेष सत्ता नव्हती. स्पार्टाच्या मागून थीबी व शेवटीं मॅसिडोनियन साम्राज्य आलें.

ग्रीक साम्राज्यांतील अंतःकलह : अथेन्स आणि स्पार्टा

मॅसिडोनिया संस्थान ग्रीसच्या उत्तर भागांत असून हळू हळू त्यानें आपली उन्नति करून घेतली होती. फिलिफ राजा हा योद्धा आणि मुत्सद्दी पण होता. त्यानेंच मॅसिडोनियाचें राज्य वाढविलें व ग्रीस आपल्या ताब्यांत ठेविलें. त्याचा मुलगा अलेक्झांडर हा जगविख्यात पुरुष होऊन गेला. त्यानें ईजिप्त आणि हिंदुस्थानच्या पश्चिमेकडील आशियाखंडाचा सर्व भाग पादाक्रांत करून ग्रीक संस्कृति पूर्वेकडे आणिली. काबूलच्या मार्गानें खायबर खिंडींतून तो हिंदुस्तानांत उतरला व पंजाब प्रांत जिंकल्यावर आणखी पूर्वेकडे जाण्याचा त्याचा इरादा होता. पण त्याच्या सैन्यानें नाखुषी दर्शविल्यावरून तो परत फिरला ( खि. पू. ३२४ ) व नंतर एका वर्षांतच वारला.

**मॅसिडोनियन साम्राज्य अलेक्झांडर**

जगाच्या सांस्कृतिक इतिहासात अलेक्झांडरचा दर्जा फार मोठा आहे. ‘ पूर्व आणि पश्चिम ’ खंडांचा संयोग करून सर्वत्र एक साम्राज्य आणि एक संस्कृति करून सोडावी असा त्याचा विचार होता व त्याला कांहीं यशहि आलें होतें. अलेक्झांडरच्या दिग्विजयामुळें ग्रीक संस्कृति जी सर्व पूर्वपश्चिम राष्ट्रांवर पसरली तिला ‘ हेलेनिझम ’ असें विशिष्ट नांव आहे. हिंदुस्थान ते इटलीपर्यंत ग्रीक भाषा आणि विद्या हीं सव राज्यांतून सुरू झाली व बरींच शतकें टिकलीं. व्यापारी दळणवळण इतकें सुरू झालें कीं, चीनचें रेशीम युरोपखंडांत येऊं लागलें. वाङ्मय आणि कला या बाबतींत तर कडेलोट झाला होता म्हणण्यास हरकत नाहीं. या काळांतील साक्रेटीस, प्लेटो, अरिस्टॉटल यांसारखे तत्त्वज्ञानी

**हेलेनिझम किंवा ग्रीक संस्कृतीचा दिगंतरीं प्रसार**

पंडित जगाला अद्याप ललामभूत होऊन राहिलेले आहेत. अलेक्झांडरच्या वंशजांनीं ईजिप्तमध्यें अलेक्झांड्रिया येथें एक शास्त्रीय विश्वविद्यालय जें चालविलें त्याची कीर्ति त्रिखंड गाजली आहे. पाश्चात्य भूमितीचा जनक युक्लिड, ज्योतिषी हिपार्कस, पहिलें वाफेचें इंजिन शोधून काढणारा इंजिनियर हेरो यांसारखे शास्त्रज्ञ अलेक्झांड्रिया विश्वविद्यालयांतीलच होत. अलेक्झांड्रिया येथील ग्रंथसंग्रहालयहि फार मोठें असे. त्यांत लाखों पुस्तकें असत. त्या वेळीं ग्रीक साम्राज्यभर खेड्यांतूनहि ग्रंथालयें असत. नवीन ग्रंथ काढणें, जुने नक्कलणें, त्यांचा प्रसार करणें वगैरे वाङ्मयसंवर्धनाचे आजचे विविध प्रयत्न त्या वेळींहि चाललेले असत.

**ग्रीकसाम्राज्याचा नाश**

अलेक्झांडरनंतर मात्र ग्रीक साम्राज्य डबघाईस आलें. त्याच्या निरनिराळ्या प्रांतांवरील सुभेदारांत चुरशीचीं भांडणें लागलीं व हळू हळू एकेक प्रांत साम्राज्याच्या कक्षेंतून जाऊं लागला. शेवटीं खि. पू. दुसऱ्या शतकाच्या मध्यांत रोमन साम्राज्याचा सर्व ग्रीक प्रदेशावर पगडा बसला व ग्रीक संस्कृतीचा लय रोमन संस्कृतींत झाला.

**ग्रीक आणि रोमन संस्कृतींची तुलना**

ग्रीक संस्कृतीच्या पायावर पाय ठेवून रोमन संस्कृति पुढें आली. ग्रीक आणि रोमन या दोन लोकांत बरेंचसें साम्य दिसत असलें तरी, बरेच फरकहि आहेत. दोघेहि स्वतंत्रताप्रिय, पण रोमन लोक या गुणांत ज्यास्त होते. हें मात्र खरें कीं, ग्रीक लोक ज्यास्त बुद्धिमान् आणि कोंवळ्या अंतःकरणाचे असत. पण कोंवळें मन चंचल असतें म्हणून ग्रीक राष्ट्रांत राज्य टिकविण्या-

जोगे गुण आले नाहींत. कलाकौशल्यादि शास्त्रांत ग्रीकांचा श्रेष्ठपणा, तर कायदेकानू आणि व्यवहार यांत रोमन लोकांचा हातखंडा ! व्यक्तिस्वातंत्र्याचें स्तोम माजवून ग्रीकांनीं आपल्या स्वातंत्र्यावरच गदा आणली, तर रोमन लोकांनीं राष्ट्राभिमान लोकांत जागृत करून स्वदेशाचें कल्याण करण्याकडे लक्ष ठेविलें.

याप्रमाणें ग्रीक आणि रोमन यांच्यांत निरनिराळ्या गुणांचें आधिक्य होतें; व या एकंदर गुणांचा युरोपखंडांतील पुढील राष्ट्रांस फार उपयोग झाला.

**कार्थेजशीं रोमचा जिवापाड झगडा**

ग्रीक साम्राज्य बुडवून आपण त्या जागीं आल्यानंतर रोमन साम्राज्याला शांततेनें रहातां आलें नाहीं. आफ्रिकेच्या उत्तर किनाऱ्यावरील कार्थेज राष्ट्रानें युरोपच्या दक्षिण किनाऱ्यावर स्वाऱ्या करून बहुतेक भाग ताब्यांत ठेवला होता. तेव्हां साहजिकच रोमला आपलें राज्य कायम राखण्याकरितां या कार्थेजियन म्हणजेच सेमेटिक कुळांतील आर्येतर लोकांशीं जिवापाड झगडावें लागलें. कार्थेजियन लोकांचें आरमार फार मोठें व बलिष्ठ होतें. त्यांचा विख्यात सेनापति हानिबाल यानें रोमन लोकांना कित्येकदां धूळ चारली होती. पण अखेरीस रोमन लोकांचाच जय होऊन कार्थेज साम्राज्य धुळीस मिळालें; व रोमन साम्राज्य स्पेनपासून आशियामायनरपर्यंत भूमध्यसमुद्राच्या दोन्ही किनाऱ्यांनीं पसरलें ( खि. पू. १४६ ). हानिबाल हा जगांतील श्रेष्ठ योद्ध्यांपैकीं गणला जातो व त्यानें चालविलेलें दुसरें प्युनिक युद्ध सबंध मानवी इतिहासांत घडून आलेल्या प्रचंड युद्धांपैकीं एक म्हणतां येईल.

शेतकी आणि सदाचरण यांनीं राहणारे रोमन लोक श्रीमंत आणि सत्ताधारी होत चालल्यावर त्यांच्यांत दुर्गुण शिरूं लागले, स्वार्थ डोकावूं लागला आणि त्यामुळें पुढाऱ्यापुढाऱ्यांत भांडणें सुरू झालीं. रोमन लोकांत मोठमोठे योद्धे होऊन गेले. या योद्ध्यांनीं, आपली छाप राज्यकारभारावर असावी म्हणून युद्धें उकरून काढलीं. जो सर्वांत शूर तो राज्याचा नेता अशी स्थिति प्राप्त झाली. मेरिअस, सल्ला, पांपी, सीझर वगैरे सेनापती एकामागून एक राज्याधिकारी झाले. सीझरला तर बादशहाप्रमाणें सर्व अधिकार होते व त्याला राजमुकुटहि अर्पण करण्यांत येत होता. म्हणजे लोकशाहीचें रूपांतर पुन्हां राजशाहींत झालें. तेव्हां पुन्हां स्वतंत्रवृत्तीच्या कांहीं रोमन पुढाऱ्यांना हें न आवडून सीझरचा खून करण्यांत आला.

**रोमन साम्राज्यांतील राज्यकारभार**

सीझरचा पुतण्या ऑक्टेव्हिअन सीझर हा जेव्हां पुढारी झाला, तेव्हां त्यानें राजा होण्याचा घातुक अभिलाष धरला नव्हता, तरी त्याला राजाच्या वरची पदवी 'ऑगस्टस' ही देण्यांत आली व त्याच्यापासून रोमन बादशाहीस सुरुवात झाली ( खि. पू. २७ ). सर्व रोमन बादशहा सैन्याच्या बलावरच सत्ता गाजवीत. साम्राज्यांत सीनेटचा म्हणजे लोकप्रतिनिधिमंडळाचा बोज मुळींच राहिला नाहीं. मात्र साम्राज्य अतोनात वाढलें. ब्रिटनवर रोमन राज्य आलें व हिंदुस्थानच्या सरहद्दीपर्यंत रोमन सैन्य येऊन थडकलें. पण लवकरच त्याची वाढ खुंटली व उतरती कळा लागली. रानटी लोकांचे एकसारखे हल्ले सुरू

**रोमन बादशाही व ऱ्हासास आरंभ**

होऊन रोम पडलें ( इ. स. ४१० ). इ. स. ४ थ्या शतकांत कान्स्टंटाईन बादशहानें पूर्वेस कान्स्टँटिनोपल राजधानी करून जें बिझान्टिअम साम्राज्य स्थापिलें होतें तें मात्र पुढें एक हजार वर्षेंपर्यंत टिकून राहिलें. नंतर तें तुर्कांच्या ताब्यांत गेलें.

**युरोपांत रानटी लोकांचा धुमाकूळ**

ज्या रानटी लोकांच्या हल्ल्यांनीं रोमन साम्राज्य नष्ट झालें ते रानटी लोक म्हणजे गॉथ आणि हूण हे होत. गॉथ लोक स्वीडनमधील व हूण हे आशियाखंडांतले होते. फ्रँक आणि जर्मन टोळ्याहि लुटालुटीच्या शोधांत रोमन साम्राज्या-वर तुटून पडल्या होत्या. पण या सर्व रानटी लोकांनाहि रोमन सुधारणा घ्याव्या लागल्या.

**रोमन संस्कृतीचा आधुनिक जगावर ठसा**

आजच्या जगावर रोमन संस्कृतीचा ठसा अगदीं दिसून येण्यासारखा पडला आहे. रोमन कायदेकानू आणि राजनीति या तर आज पाश्चात्य संस्कृतीनें स्वीकारल्या आहेत. रोमन पद्धतीवर बांधल्या गेलेल्या व जाणाऱ्या इमारती जिकडेतिकडे दिसतात. सर्वच रहदारीचे उत्तम रस्ते करणें व मोक्याच्या जागीं लष्करी वसाहती ठेवणें या गोष्टी आजचीं सुधारलेलीं राष्ट्रें करीत आहेतच. ग्रीक अमदानींत जी सर्वत्र अशांतता व बखेडा माजला होता तो सीझर, ऑगस्टस वगैरे बादशहांच्या राज्यसुधारणां-मुळें नाहींसा होऊन ' रोमन शांतता ' असा वाक्प्रचारच पडला. लॅटिन भाषा आणि चालीरीती ह्या इटली, गॉल, स्पेन आणि इतर देशांतून रुजल्या. इटालियन, फ्रेंच, स्पॅनिश आणि पोर्तुगीज भाषांना ' रोमान्स ' भाषा म्हणतात. ख्रिस्ती धर्माचा रोमन साम्राज्यानें अंगि-

कार केल्यामुळें रोम येथेंच त्या धर्माचें आद्यपीठ स्थापन होऊन मुख्य शंकराचार्य जे पोप त्यांचीं सर्व ख्रिस्ती लोकांना ताकीदपत्रें रोमहूनच सुटूं लागलीं. आजहि कॅथॉलिक ख्रिस्ती लोकांचें धर्मपीठ रोम येथें आहे.

रोमन साम्राज्य गुलामांनीं चालविलें!

रोमन साम्राज्य हें गुलामांचें साम्राज्य म्हणतां येईल. कारण त्यांत रोमन लोकांनीं जिंकून आणलेले गुलामच जास्त होते. स्वातंत्र्य फार थोड्या लोकांना असे. त्यामुळें साम्राज्य आंतून पोखरलें गेलें. रोमन लोक चांगले शिकलेले असत, पण त्यांना शिकविण्याचें काम त्यांचे ग्रीक गुलाम करीत! नाटकें, खेळ, सामने या करमणुकींना तर ऊत आला होता. व्यापारी दळण-वळण तर सबंध जगभर होतें. रोमचीं सोन्याचीं नाणीं यामुळें सर्व देशांतून आढळत असत.

## उत्तरार्ध

तार्तरी लोकांचें युरोपांत वर्चस्व व फ्रेंच साम्राज्याचा उदय

रोमन साम्राज्य मोडल्यानंतर दोन शतकांपर्यंत युरोपभर रानटी लोकांचा धुमाकूळ चालला होता. शहरांतून मात्र सुधारणा नाहींशी झाली नव्हती. पण इतरत्र वित्त आणि जीवित यांची सुरक्षितता नव्हती. कांहीं रानटी राजे मात्र रोमन राजांचें अनुकरण करून त्यांच्या सुधारणा चालू ठेवीत. मोंगली हूण किंवा तार्तर हे पांचव्या शतकांत फार प्रबळ झाले होते. त्यांचा प्रसिद्ध पुढारी अट्टिल हा गॉलपर्यंत चढाई करून गेला होता, तेव्हां इतर रानटी टोळ्यांनीं एकत्र होऊन त्याचा चेलान्स येथें पराभव केला ( इ. स. ४५१ ). पण पुढील वर्षीं तो इटलीवर चालून गेला. याच वेळेस कांहीं इटालियन लोकांनीं पळून जाऊन व्हेनिस

येथें नवी वस्ती केली व पुढील इतिहासांतील सुप्रसिद्ध व्हेनिस राज्याचा पाया घातला. सहाव्या शतकांत पश्चिम युरोपांत सर्व सुधारणांचा लोप होऊन अंधःकार पसरला होता; त्याच सुमारास फ्रँक लोकांनीं एक नवें साम्राज्य उदयास आणलें. या फ्रेंच साम्राज्यानें मुसलमानांना थोपवून धरलें, इतकेंच नव्हे तर सर्वत्र माजलेली बंडाळी मोडून पुनः युरोप एकसूत्री केलें. या फ्रेंच साम्राज्यांत शर्लेमान नांवाचा जगविख्यात बादशहा होऊन गेला ( आठव्या शतकाच्या उत्तरार्धांत ). हा मोठा योद्धा व मुत्सद्दीहि होता. त्यानें जर्मनी आणि इटली काबीज करून रोम येथें आपल्याला पोपकडून राज्याभिषेक करवून घेतला. या वेळेपासून पोप आणि इटलीचा बादशहा यांनीं 'पवित्र रोमन साम्राज्य' पुन्हां चालू करून जगाच्या इतिहासाचें केंद्रस्थान रोम शहरीं ठेविलें. बादशहाकडे लोकांचें ऐहिक संरक्षण व पोपकडे पारलौकिक कल्याण असल्यामुळें पुन्हां युरोपखंडाची उन्नति होऊं लागली.

**नॉर्थमेन ऊर्फ चांच्यांची सर्वत्र सत्ता**

शर्लेमानच्या मृत्यूनंतर जर्मनी आणि फ्रान्स विभक्त झाले. बाल्टिक आणि उत्तर समुद्रावरील चांच्या लोकांनीं रशियावर राज्य चालविलें. याच नॉर्थमेननीं नवव्या शतकांत इंग्लंड घेऊन तेथील अल्फ्रेड राजाला हांकून लाविलें. नंतर यांनीं पुढें अमेरिकेंत पाऊल टाकलें.

**ख्रिस्ती आणि मुसलमान यांमध्यें धर्मयुद्धें**

अकराव्या शतकांत नॉर्मन लोकांनीं इंग्लंड जिंकून इंग्लंडचा आणि फ्रान्सचा आजतागायत टिकणारा संबंध जोडून दिला. इकडे पूर्वेस अरब लोकांचें सामाज्य चांगल्या स्थितींत नांदत होतें. पाश्चिमेपेक्षां पूर्वेकडेसच विद्या आणि

कला यांचें माहेरघर दिसत होतें. ज्यू आणि अरब लोकांना ॲरिस्टॉटलचें तत्त्वज्ञान जास्त अवगत असून इतर शास्त्रांतहि त्यांनीं प्राविण्य संपादलें होतें. अरबांचे भाऊबंद जे तुर्की लोक त्यांनीं पुन्हां मुसलमानी अंमल वाढविण्याची खटपट केली. खिस्ती धर्मानुयायांचें मुख्य धर्मक्षेत्र जें येरुशलेम तें तुर्कांच्या हातीं असल्यानें त्याची मुक्तता करण्यासाठीं युरोपांतून बऱ्याच मोहिमा गेल्या. पण १९१८ पावेतों येरुशलेम तुर्कांच्याचकडे होतें. तथापि अकराव्या बाराव्या शतकांतील खिस्तीधर्मयुद्धांमुळें सबंध युरोपखंडांत खिस्ती धर्माबद्दल फार जागृति होऊन धर्मरक्षणाकरितां कां होईना पण सर्व खिस्ती राष्ट्रें मुसलमानांविरुद्ध एक झालीं.

**विद्यापुनरुज्जीवन व उच्च शिक्षणसंस्थांची स्थापना**

आजच्या काळच्या मानानें पाहिल्यास मध्ययुगांत विद्येची प्रगति फारशी झाली नव्हती. रोमन संस्कृति नष्ट झाल्यापासून शर्लेमानचें साम्राज्य होईपर्यंत तर युरोप अज्ञानांधःकारांत होतें असें म्हणावें लागेल. शर्लेमान राजानें देवळें आणि मठ यांतून शाळा सुरू केल्या. त्या शाळांतून भिक्षुक लोक लॅटिन भाषेंतून धार्मिक ज्ञान देत. ॲरिस्टॉटल आदि तत्त्वज्ञान्यांचे ग्रंथहि अभ्यासिले जाऊन त्यांवर वादविवाद आणि टीका होत. तथापि बहुजनसमाज अगदीं निरक्षर होता व त्यामुळें उपाध्यायवर्गाचा त्याच्यावर सहज पगडा बसे. पुढें पुढें जेव्हां युरोपखंडांत शांतता येऊं लागून व्यापार आणि दळणवळण वाढलें व शहरांतून सुखसोई आणि स्वास्थ्य हीं लोकांना मिळूं लागलीं तेव्हां विद्याहि वाढूं लागली. हा विद्येच्या उदयाचा काळ मोठा संस्मरणीय धरला जातो.

मुख्यत: इटलींत स्वतंत्र शहरांतून ही विद्यावृद्धीची लाट उसळून लिसबन, पॅरिस, ब्रुजेस, लंडन, ॲन्ट्वर्प, हॅम्बर्ग वगैरे इतर राजधान्यांतूनहि पसरत चालली. बाराव्या शतकांत रोमन कायदेकानूंचा अभ्यास पुन्हां सुरू झाला. बोलोना विश्वविद्यालयांत या कायद्यांचा अभ्यास करण्यासाठीं बाहेरून विद्यार्थी येऊं लागले व इतर शहरांतूनहि साधारणत: चर्चला जोडूनच कॉलेजें आणि विद्यापीठें निघूं लागलीं. सॅलामांका ( स्पेन ) व पॅरिस विद्यापीठांचा लौकिक त्या वेळीं फार मोठा होता.

शास्त्रीय संशोधनाला आरंभ

या वेळीं ग्रीक विद्याहि ऊर्जितावस्थेस आली. कारण इटालियन पंडित आणि कारागीर प्राचीन ग्रीक संस्कृतीला उचलून धरूं लागले. तथापि 'जुनें तें सोनें' असें न मानतां जुन्या विद्येला कसाला लावून त्यांतला बरावाईटपणा बाहेर काढण्यांत येत असे. म्हणजे विद्वान् लोकांत चिकित्साबुद्धि वाढली व एकंदरीनें सर्वत्र जिज्ञासा उत्पन्न झाली. यामुळें सर्वच बाजूंनीं सुधारणा आणि संशोधन हीं होऊं लागलीं. ऑक्सफोर्डाचा एक भिक्षुक रॉजर बेकन म्हणून जो होता त्यानें लोकांत शास्त्रीय बुद्धि जागृत केली. 'प्रयोग करा' 'प्रयोग करा' असें तो वारंवार बजावीत असे. वल्ह्यांखेरीज समुद्रांतून नावा जातील, जनावरांनीं ओढल्याखेरीज गाड्या चालतील व पक्ष्यांप्रमाणें माणसाला हवेंतून उडतां येईल असें यानें जें सहाशें वर्षांपूर्वीं भविष्य केलें होतें तें तंतोतंत खरें ठरलें आहे. अशा रीतीनें सर्व युरोपभर वाङ्मय आणि कला या शाखांत सर्वांगीण प्रगति होऊन शास्त्रीय संशोधनाचाहि पाया घातला गेला.

**धर्मसुधारणेची लाट व पोपाच्या सत्तेला ओहोटी**

वर सांगितल्याप्रमाणें लोक जसजसे सुशिक्षित आणि चिकित्सक बनत चालले तसतशी त्यांच्यांत धर्मसुधारणेबद्दल आस्थाहि उत्पन्न होऊं लागली. आपल्या धर्मांतील उपदेश तरी काय आहेत, ते बरोबर आहेत कीं नाहींत, आपले गुरुजी सांगतात त्यावर विश्वास ठेवावा कीं नाहीं, भिक्षुकांचें वर्तन नीतीला धरून आहे कीं नाहीं, यांसारख्या शंका सुधारकांना येऊं लागून त्यांनीं धार्मिक व्यवहारासंबंधीं जाहीर चर्चा सुरू केल्या. तेव्हां मात्र पोपचें आसन डळमळूं लागलें. कारण चर्चचें साम्राज्य लोकांच्या अंत:करणावरच असणार व तें अंत:करण जर धर्माधिकाऱ्यां विरुद्ध बनूं लागलें तर साम्राज्य टिकणार कोठून ? पोप किंवा धार्मिक सत्ता याचें सैन्य म्हणजे ' मंक ' किंवा भिक्षू. या सैन्यामार्फत धर्माधिकार चालत असे. पण जेव्हां हे भिक्षू अगदीं अनाचारी व धार्मिक कामाला नालायक असे आढळून येऊं लागले, तसेंच पोपसकट सर्व धर्माधिकाऱ्यांमध्यें मानाच्या जागांबद्दल मोठीं भांडणें होऊं लागलीं, तेव्हां साहजिकच त्यांच्याविषयींची श्रद्धा लोकांतून उडाली व वाइक्लिफ, ल्यूथरसारखे धर्मसुधारक निघाले. छापण्याची कला निघाल्यापासून तर बायबल पुष्कळांच्या घरीं मिळूं लागलें व त्यामुळें प्रत्यक्ष पुरावे दाखवून पोप व त्यांचे अनुयायी यांच्याशीं भांडतां येऊं लागलें. इंग्लंड, स्कॉटलंड, स्वीडन, नॉर्वे, डेन्मार्क, जर्मनी ( उत्तर ) वगैरे राष्ट्रांनीं पोपची सत्ता झुगारून देऊन सर्व धार्मिक सत्ता आपल्याकडे ठेवली. या धर्मसुधारणेला आणखी बरेच फांटे फुटले, व नवीन नवीन धर्मपंथ निघाले. याप्रमाणें एके वेळीं सबंध युरोपखंडावर गाजत असलेलें

पोपचें वर्चस्व अगदीं संकुचित होऊन ते आतां जवळजवळ नामशेष झालें आहे. हल्लीं फक्त रोमन कॅथॉलिक ख्रिस्ती लोक पोपला आपला धर्मगुरु असें मानतात.

**सरंजामी पद्धत व तिचे गुणदोष**

मध्ययुगांत आणखी एक महत्त्वाची गोष्ट घडून आली, ती म्हणजे सरंजामी पद्धतीचा उदय. पहिल्या प्रकरणांत समाजाची घडण कशी बनत जाते हें सांगत असतांना मनुष्य आत्मसंरक्षणासाठीं आपले कांहीं हक्क दुसऱ्याच्या स्वाधीन करून त्याचा गुलाम कसा बनतो हें दाखविलें आहे. हीच गोष्ट अशांततेच्या काळांत घडते. आपलें जीवित आणि वित्त यांचें रक्षण होण्याकरितां असहाय मनुष्य आपल्याहून बलिष्ठ माणसाला कांहीं खंडणी देऊन त्याचा नोकर बनतो. हा बलिष्ठ मनुष्य आपल्याहून वरचढ अशा तिसऱ्याच मनुष्याची मदत घेत असतो. तिसरा चवथ्याची घेतो. याप्रमाणें पायरीपायरीनें ही गुलामगिरीची सांखळी खालपासून वरपर्यंत पोहोंचलेली असते; एक शहर दुसऱ्याच्या अंकित, एक राजा किंवा धर्माधिकारी आपल्यापेक्षां बलवान् माणसाचा नोकर अशा पद्धतीनेंच ही बने. ही सरंजामी पद्धत इतकी रूढ होऊन बसली कीं, सरंजामी सरदार पुढें स्वतंत्र राजे बनून बेजबाबदार झाले. त्यांनीं रोमन साम्राज्याच्या नाशानंतर रानटी टोळ्यांचा धुव्वा उडवून युरोपियन राष्ट्रांना सुरक्षितता आणली असली तरी हेच सरदार पुढें वरचढ झाले व त्यांना निर्बल करण्यासाठीं राज्यकर्त्यांना मोठमोठे उपाय करावे लागले. ही सरंजामी पद्धत इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, इटली या मोठमोठ्या राष्ट्रांना पोखरूं लागली. तेव्हां राजे लोक सरंजामी सरदारांशीं युद्ध करूं

लागले व हळू हळू तिला दडपूं लागले. तथापि अद्याप ती अजिवात नाहींशी झाली नाहीं. तरी पण ती आज फारशी जाचक नाहीं.

सुधारलेले जुलूम

पण सरंजामी पद्धत मोडत चालल्यापासून राजसत्तेला जोर चढला व राजे जुलमी होत चालले. त्यांच्या जुलमाचे प्रकार सुधारलेल्या काळाप्रमाणें सुधारलेलेच असत. तेव्हां लोकांमध्यें राजसत्तेला आळा घालण्याची चळवळ सुरूं झाली. तिचें पर्यवसान लोकशाही किंवा पार्लमेंटरी राज्यपद्धति यांत झालें.

---

## प्रकरण ६ वें

# भारतीय संस्कृतीचा अखंड विकास

भारतीयांची अव्याहत चाललेली परंपरा

या प्रकरणांत खि. पू. १५०० पासून मध्ययुगाच्या अखेरपर्यंत ( सुमारें इ. स. १५०० ) तीन हजार वर्षांचा हिंदुस्थानचा इतिहास व भारतवर्षाची संस्कृति या काळांत काय होती या दृष्टीनें पहावयाचा आहे. या देशाच्या विशिष्ट रचनेमुळें याची संस्कृति इतर राष्ट्रांपेक्षां अगदीं निराळी व सतत टिकणारी अशी आहे. ज्याची भाषा, वाङ्मय आणि सामाजिक-धार्मिक संस्था हीं गेलीं तीनचार हजार वर्षें कांहींहि प्रतिबंधांना न जुमानतां टिकून आहेत असें दुसरें उदाहरण चीनखेरीज सबंध जगांत आढळणार नाहीं. वैदिक कालापासून अकराव्या शतकांत मुसलमानी वर्चस्व जाणवूं लागेपर्यंत भारतीय संस्कृति सर्वांगांनीं विकास पावत होती. केवळ वेदांत, तत्त्वज्ञान किंवा ईश्वरविषयक

ज्ञान यांतच भारतानें अद्वितीय प्राविण्य संपादिलें होतें असें नसून सर्व विद्या आणि कला यांत सुद्धां आघाडी मारली होती. आजपर्यंत भारतीय संस्कृतीला मारक अशा अनेक गोष्टी होऊन गेल्या आहेत. पण त्या संस्कृतीच्या अंगींच इतका जीवटपणा किंवा चिवटपणा आहे कीं, ती वैदिक काळीं होती तशीच जवळजवळ आजहि आहे. शक, हूण इत्यादि बारीकसारीक परकीय संस्कृती मार्गेच तिनें आपल्या विशाल उदरांत गडप केल्या व इस्लामी आणि ख्रिस्ती या मोठ्या संस्कृतींशीं ती आज अनेक शतकें टक्करा देत आहे. पण तिच्यांतील सत्त्व गेलें नाहीं. असो. आतां पौराणिक कालानंतर हिंदु संस्कृति कशी विकसत गेली तें पाहूं.

**बुद्ध व बौद्ध धर्माचा आशियाखंडभर प्रसार**

वैदिक, पौराणिक कालानंतर हिंदुस्थानच्या इतिहासांतील सर्वांत पहिली थोर व्यक्ति म्हणजे गौतम बुद्ध होय. त्याचा जन्म एका राजकुळांत झाला ( खि. पू. ५६० चा सुमार ). पुढें संसाराविषयीं त्याला वीट येऊन तो आत्म्याच्या खऱ्या उन्नतीकरितां बाहेर पडला व घोर तपश्चर्या करून त्यानें निर्वाणाचा ( अक्षय्य सुखाचा ) मार्ग शोधून काढला. तो मार्ग म्हणजेच बौद्ध धर्म. बुद्धानें सामान्य जनाला समजेल व पटेल अशीं नीतितत्त्वें उपदेशिलीं आहेत. जन्म हीच मुळीं मनुष्यावरची मोठी आपत्ति आहे व ती चुकविण्यासाठीं त्यानें सत्कर्म जोडलें पाहिजे; व हें सत्कर्म जोडण्यासाठीं त्यानें चोरी, शिंदळकी, खून, खोटेपणा, निंदा, अश्लीलपणा, लोभीपणा, द्वेष व अज्ञान हीं टाळलीं पाहिजेत. भाषण, आचरण, विचार, आठवणी, श्रद्धा, कर्म व उपजीविकेचें साधन हीं शुद्ध

आणि सात्त्विक ठेविलीं पाहिजेत. तसेंच मन:शांतीसाठीं माणसानें बौद्ध संघांत दाखल होऊन वैराग्यानें काळ कंठिला पाहिजे. हीं धर्मतत्त्वें पुढील भक्तिमार्गांतील तत्त्वांप्रमाणें सामान्य अशिक्षित बहुजनसमाजाला पटून लगेंच थोड्याच वर्षांत बौद्ध धर्माचा हिंदुस्थानांत आणि बाहेरहि प्रसार झाला. चीन, जपान, तिबेट, नेपाळ, भूतान, अफगाणिस्तान, सुमात्रा, जावा, सीलोन, सयाम वगैरे आशियाखंडांतील मोठमोठ्या देशांतून बौद्ध धर्माला बरेच अनुयायी मिळाले. खुद्द हिंदुस्थानांत अशोक सम्राटानें धर्मप्रचारक चोहोंकडे पाठवून या धर्माचा सर्वत्र फैलाव केला. पुढेंहि तीनचार शतकें याचा उत्कर्ष होत होता. पण इ. सनाच्या आठव्या शतकापासून ऱ्हास होऊं लागून लवकरच तो हिंदुस्थानांतच नामशेष होऊन गेला. सिलोन, ब्रह्मदेश, जपान या देशांतून मात्र तो अद्याप टिकून आहे.

जैनधर्म

बौद्धधर्माच्या उदयाच्या सुमारासच महावीरानें जैनधर्माचा पुरस्कार जोरानें केला. तोहि बुद्धाप्रमाणेंच विरक्त होऊन खरा मोक्ष मार्ग शोधण्याच्या खटपटीस लागला होता. अखेरीस त्यानें आपला जैन धर्म स्थापन केला. याहि धर्मांत लोकांनीं भिक्षू आणि भिक्षुणी होऊन सर्वसंगपरित्याग करून मठांतून रहावें अशी आज्ञा आहे. परमात्मा म्हणून कोणी नाहीं; मनुष्य आणि इतर प्राणी यांच्याप्रमाणेंच झाडें, वायु, अग्नि यांना जीव आहे; हिंसा अगदीं निषिद्ध आहे; स्वत:च्या वासना मारून मनुष्यानें कर्मांतून मुक्त व्हावयाचें आहे. यांसारखीं जैनतत्त्वें अगदीं साधीं पण वैदिक धर्माच्या जरा विरुद्ध अशीं आहेत.

हा जैन धर्म हिंदुस्थानाच्या बाहेर न जातां हिंदुस्थानांतच कांहीं ठिकाणीं पसरला. मुख्यतः दक्षिण हिंदुस्थानांत हा रुजला होता. पण शैवपंथानें त्याची हकालपट्टी चालविली व तामिळ प्रांतांतून तर त्याला थारा मिळेनासा झाला. पुढें म्हैसूर प्रांतांत लिंगायतधर्म येईपावेतों ( १२ वें शतक ) त्याची चहा होती. तीहि नंतर रामानुजी पंथानें नाहींशी केली. आज जैन लोक संख्येनें फार थोडे असून सर्व हिंदुस्थानभर विखुरले आहेत.

**जैनधर्माचा संकोच**

वरील बौद्ध आणि जैन हीं हिंदु धर्माचींच फळें असून त्यांनीं मूळच्या हिंदु संस्कृतींत अहिंसा–प्राण्यांची हत्या न करणें–हें मोठें उदात्त तत्त्व दृढमूल करून टाकलें. या तत्त्वामुळें हिंदु धर्माचा जसा कांहीं फायदा तसा तोटाहि झाला आहे, हें कबूल केलें पाहिजे. जैन आणि बौद्ध संप्रदायांना अनुसरून बहुजनसमाजाला मानवेल असा जो दुसरा एक सोपा पंथ हिंदु धर्माच्या पोटांतून निघाला तो भक्तिमार्ग. ईश्वर हा आपला जिवलग व अगदीं बापासारखा असून तो प्रत्यक्ष आपली काळजी घेतो, त्याच्या व आपल्यामध्यें रदबदली करण्यास कोणी मध्यस्थ लागत नाहीं ही जाणीव भक्ताला दिली गेल्यामुळें व केवळ ईश्वराचें नामस्मरण केल्यानें मोक्ष मिळतो अशी ज्याची दृढ भावना झाल्यामुळें या भक्तिपंथाला लाखों अनुयायी मिळाले; व आज तो अनेक नांवांनीं हिंदु समाजांत जोमानें वाढत आहे व हिंदु धर्माला चिरंजीव करीत आहे. कारण कोठल्याहि धर्मांतलें सार यांत आहे व आचरण्यास याच्याइतका दुसरा सोपा धर्म नाहीं.

**अहिंसा तत्त्व व भक्तिमार्ग**

बुद्धकालीन हिंदु संस्कृति

गौतम बुद्धाच्या काळची भारताची संस्कृति बौद्ध ग्रंथांवरून अजमावतां येते. त्या वेळीं ग्रामपंचायती असून गांवांतून सभागृहें बांधलेलीं असत. जमिनीवर मालकी व्यक्तीची नसे. लोक राजा निवडीत. त्या काळांत धंदे चांगले चालत असून धंद्यांचे संघहि असत. नाणीं व हुंडया चालत व वहातुकीला जलमार्ग आणि खुष्कीचे मार्ग दोन्ही मोकळे होते. यावरून सुमारें २५०० वर्षांपूर्वीचा हिंदुसमाज किती सुधारला होता हें दिसून येतें.

अशोकाचें साम्राज्य

आतां हिंदुस्थानचा मागचा राजकीय इतिहास पहावयाचा म्हणजे अनेक राजघराण्यांची माहिती द्यावी लागेल. पण सांस्कृतिक इतिहासाला त्याची फारशी गरज नाहीं. प्राचीन काळचें पहिलें प्रख्यात राजघराणें म्हणजे मौर्यांचें. या घराण्यांत अशोक चक्रवर्ती होऊन गेला. त्यानें उत्तम प्रकारें राज्य चालविलें व वाढविलेंहि. त्यानें दगडांवर व खांबांवर आपल्या आज्ञा लिहून ठेवलेल्या अद्याप पहावयास मिळतात. त्यानें बौद्धधर्माचा उपदेश करण्यासाठीं काश्मीर, इराण, सिलोन व अलेक्झांड्रियापर्यंत दूरवरहि प्रचारक पाठविले होते. अशोकाच्या पूर्वी सरासरीं अर्धें शतक अलेक्झांडरनें हिंदुस्थानावर स्वारी करून पंजाब आपला सुभा बनविला होता. पण अशोकानें अफगाणिस्तानहि आपल्या साम्राज्यात घेतला; व परकीयांचा हात हिंदुस्थानांत मुळींच शिरकूं दिला नाहीं. पण अशोकानंतर पांच शतकेंपर्यंत कोणीहि बलाढ्य सम्राट् झाला नाहीं व जिकडेतिकडे बेबंदशाही माजली. तेव्हां पुन्हां परकीयांच्या स्वाऱ्या हिंदुस्थानावर सुरू झाल्या.

परकीयांच्या हिंदुस्थानवर स्वाऱ्याः कुशान साम्राज्य

हिंदुस्थानच्या पश्चिमेस बॅक्ट्रिया आणि पार्थिया हीं दोन राज्यें अशोकाच्या काळांत भरभराटींत होतीं. हीं ग्रीक साम्राज्य दुर्बल झाल्यानंतर फुटून स्वतंत्र झालेलीं होतीं. बॅक्ट्रियन लोक ग्रीक संस्कृतीचे होते; पण पार्थियन आजच्या अफगाण लोकांप्रमाणें डोंगरी असत. पुढें शक आणि कुशान या मध्य-आशियांतील रानटी टोळयांनीं हीं राज्यें बुडवून हिंदुस्थानांत प्रवेश केला. कुशान लोकांचें राज्य काशीपासून इराणापर्यंत पसरलें असून पेशावर ही त्यांची राजधानी होती. त्यांचा सुप्रसिद्ध राजा कनिष्क ( इ. स. १२० ) यानें अशोकाप्रमाणें बौद्धधर्माला बरीच चालना दिली. नागार्जुन, अश्वघोष व वसुमित्र यांसारखे बौद्ध ग्रंथकार याच्या अमदानींतच उदयास आले. वास्तुशिल्प आणि मूर्तिशिल्प व इतर कलाहि कनिष्कानें आश्रय देऊन वाढविल्या. सारानाथ, अमरावती व मथुरा येथील प्रेक्षणीय शिल्प याच्याच वेळचें आहे.

सस्सन व आंध्र

कुशान घराण्याच्या अमदानींत इराणांत सस्सन घराण्याचा अंमल होता. या सस्सन राजांनीं हिंदुस्थान काबीज करण्याचा बऱ्याच वेळां प्रयत्न केलेला दिसतो. याच काळांत दक्षिण हिंदुस्थानावर आंध्र राजांची सत्ता होती. हें घराणें खि. पू. २२० ते इ. स. २२५ पर्यंत अव्याहत राजैश्वर्य भोगीत होतें. यांतील गोतमीपुत्र यज्ञश्री हा राजा अत्यंत बलिष्ठ होऊन गेला. आंध्र राजांनीं विशेषतः हालानें प्रचलित प्राकृत भाषेंत उत्कृष्ट वाङ्मय तयार करविलें. महाराष्ट्री भाषेंतील सप्तशती हा सुप्रसिद्ध प्राकृत ग्रंथ हालाच्याच नांवावर मोडतो.

गुप्त साम्राज्य व हर्षाचें साम्राज्य

इ. स. चवथ्यापांचव्या शतकांत उत्तर हिंदुस्थानांत गुप्त साम्राज्याचा मोठा दरारा होता. चंद्रगुप्तविक्रमादित्य (राज्यारोहण इ. स. ३७५) याचें राज्य नर्मदेच्या उत्तरेस हिमालयापर्यंत व आरबी समुद्रापासून बंगालच्या उपसागरापर्यंत व्यापून राहिलें होतें. राज्यव्यवस्था किती उत्कृष्ट होती, याबद्दल पुरावा म्हणजे फा-हिन या चिनी प्रवाशानें प्रत्यक्ष पाहून लिहिलेली हकीगत होय. पाटलीपुत्र ही गुप्तांची राजधानी फार श्रीमंत व सुखी असून तेथें ज्यांत सहासातशें विद्यार्थी शिकत आहेत अशीं दोन छात्रगृहें नामांकित होतीं. लोक अहिंसापर असून दारू, कांदा किंवा लसूणहि निषिद्ध मानीत. प्रजाजन सुखानें कालक्रमणा करीत होते. पण शंभर वर्षांतच पुन्हां हूण या परकीयांची स्वारी होऊन गुप्तसाम्राज्य लयास गेलें व त्याचीं शकलें पडलीं. त्यांपैकीं एक मोठें राज्य म्हणजे कनोजचें. इ. स. ६०६त हर्षानें आजूबाजूची बंडाळी मोडून आपलें राज्य विस्तृत केलें. त्याच्याजवळ ६०,००० हत्तींचें दळ व एक लाख पायदळ होतें. गुप्तसाम्राज्याएवढें सामाज्य हर्षानें संपादन केलें होतें. याच्या अंमदानींत दुसरा एक चिनी प्रवासी (हुएनत्संग) हिंदुस्थानांत आला होता. त्यानें सर्व हिंदुस्थान पाहून बारीकसारीक हकीकतसुद्धां जी लिहून ठेविली आहे, ती वाचण्यासारखी आहे. हर्षानें विद्येस बरेंच उत्तेजन दिल्यामुळें त्याच्या काळीं उत्कृष्ट ग्रंथ लिहिले गेले. मगध देशांत नालंदा येथें जो बौद्ध भिक्षूंचा मोठा मठ होता तो आधुनिक विद्यापीठाप्रमाणें सर्व देशाला विद्यादान देण्याचें कार्य करीत होता. हर्षानंतर पुन्हां भरतखंडांत अंदाधुंदी माजली व मुसलमानी साम्राज्य होईपावेतों

देशांत एकतंत्री आणि सुव्यवस्थित कारभार करणारें कोणतेंहि राज्य नव्हतें.

दक्षिण हिंदुस्थानांतील राज्यें: पांड्य आणि चोळ साम्राज्य

हिंदुस्थानचे दोन वेगवेगळाले भाग म्हणजे उत्तर हिंदुस्थान आणि दक्षिण हिंदुस्थान. युरोपियनांच्या स्वाऱ्या दक्षिण हिंदुस्थानावर होईपावेतों इतिहासकारांना या भागाची माहिती नव्हती. त्यामुळें १६ व्या शतकापर्यंतचा हिंदुस्थानचा इतिहास म्हणजे केवळ उत्तर हिंदुस्थानचाच इतिहास देण्यांत येतो. पण दक्षिण हिंदुस्थान उत्तर हिंदुस्थानच्याहि पूर्वीपासून सुधारलेला असून उत्तरेकडील अशोक साम्राज्याप्रमाणें तामिळ प्रांतांत पांड्य साम्राज्य नांदत होतें. एका पांडय राजानें ख्रि. पू. २० मध्यें रोमन बादशहा ऑगस्टस सीझर याकडे वकिलात पाठविली होती. पांडयाप्रमाणें पल्लव, चोल व चेर हीं राज्येंहि फार प्राचीन आहेत. अशोकाच्या लेखांतून त्यांचा स्वतंत्र राज्यें म्हणून उल्लेख येतो. राजराज चोल (९८५-१०३५) याची सत्ता बहुतेक सबंध दक्षिण हिंदुस्थान आणि सिंहलद्वीप यांवर होती. त्याचें आरमार बलिष्ठ असून समुद्रावर त्याला दुसरा प्रतिस्पर्धी नव्हता. राजेंद्र चोलानें तर ब्रह्मदेश आणि बंगाल पादाक्रांत केला होता. चोलांची राज्यव्यवस्थाहि फार नमुनेदार होती. ग्रामपंचायती असून कांहीं गांवांमिळून एक 'कुर्रम' संघ असे. या संघांना सर्व सत्ता असे. देशांत पाटबंधारे व रस्ते केलेले असत. प्रजेच्या सुखसोयींकडे विशेष लक्ष देण्यांत येत असे. चोल साम्राज्यांत प्रजेवर करांचा बोजा मोठा होता असें दिसतें. चोल राजे स्वत: धर्मानें शैव असत तथापि त्यांनीं विधर्मीयांना त्रास दिला नाहीं.

दक्षिण हिंदुस्थानांत दख्खन आणि तामिळ प्रांत असे पुन्हां दोन विभाग पडतात. दख्खनमध्यें आंध्रानंतर चालुक्य सत्ताधीश झाले. बाराव्या शतकाच्या अखेरपर्यंत या घराण्यांनीं राज्य केलें. दुसरा पुलकेशी ( ६०८–६४२ ) हा कनोजच्या हर्षाचा समकालीन असून त्याच्याप्रमाणेंच बलाढय होता. मध्यंतरीं ७५७ ते ९७३ पर्यंत चालुक्यांना बाजूला सारून राष्ट्रकूट राज्य करीत होते. चालुक्य हे परकी व राष्ट्रकूट हे स्थानिक असा भेद असल्यामुळें कांहीं काळ राष्ट्रकूट लोकप्रिय झाले होते. अमोघ-वर्ष राष्ट्रकूट ( ८१५–८७७ ) हा सर्वांत मोठा राजा होऊन गेला. तो जैनधर्मानुयायी असल्यामुळें त्याच्या अमदानींत दख्खनमध्यें जैन-धर्म जोरानें पसरला.

**दख्खन : चालुक्य आणि राष्ट्रकूट**

चालुक्यांनंतर यादव आणि होयसळ हीं राजघराणीं नांवारूपास आलीं. होयसळ राजे ११९० मध्यें स्वतंत्र झाले. बिट्टिग किंवा विष्णुवर्धन हा त्यांच्यांतील प्रसिद्ध राजा. त्यानें कला व धर्म ( जैन आणि वैष्णव ) यांना बरेंच उत्तेजन दिल्याकारणानें त्याच्या अमदानींत बरींच जैन आणि वैष्णवांचीं सुंदर आणि मोठीं देवस्थानें झालीं. रामानुजाचार्य या वेळीं त्याच्या राज्यांत येऊन राहिले होते व त्यांनीं आपल्या वैष्णव पंथाचा म्हैसूर प्रांतांत चांगलाच प्रचार केला. चवदाव्या शतकांत होयसळचें राज्य मुसल-मानांनीं बुडविलें. होयसळांची राजधानी द्वारसमुद्र, ही सांप्रत म्हैसूर संस्थानांतील हळेबीड गांव आहे त्या जागीं होती. अद्याप प्राचीन अवशेष तेथें आहेत.

**होयसळ राजे**

यादव राजे मूळ चालुक्यांचे सरदार. त्यांनीं देवगिरीस गादी स्थापून दौलताबाद व नासिक टापूंत अंमल सुरू केला. सिंघण ( १२१० ) राजानें बराच मोठा प्रदेश जिंकून यादव राज्य वाढविलें. इ. स. १२९४ त अल्लाउद्दीन खिलजीनें रामदेवराजाचा पराभव केल्यानंतर थोड्याच वर्षांनीं येथें मुसलमानी अमदानी झाली.

**यादव राजे**

सबंध हिंदुस्थानवर पहिल्यानें वर्चस्व गाजविणारे मुसलमानच होत. यापूर्वी या देशावर परकीयांच्या स्वाऱ्या होऊन काहीं भागांवर त्यांची सत्ता प्रस्थापित झाली खरी, पण सबंध हिंदुस्थान केव्हांच परकीयांच्या ताब्यांत नव्हता. पण अकराव्या शतकापासून ही स्थिति पालटून गेली. कारण १८ व्या शतकापावेतों मुसलमान आणि त्यापुढें आजतागायत युरोपियन यांचा पूर्ण अंमल हिंदुस्थानवर बसला. मध्यंतरीं दक्षिणेंत विजयानगरचे राजे आणि मराठे यांनीं, व उत्तरेस रजपुत आणि शीख यांनीं हा अंमल आपापल्या प्रांतांपुरता तरी झुगारून देण्याचा प्रयत्न केला होता व कांहीं काळ यशहि मिळविलें होतें.

**मुसलमानी आणि युरोपियन संस्कृतींचें हिंदुस्थानवर साम्राज्य**

विजयानगराचें राज्य १३३६ त स्थापन झालें व १५६५ त लयाला गेलें. संपत्ति, कलाकौशल्य आणि विद्या या बाबतींत हें शेवटचेंच मोठें हिंदु राज्य होऊन गेलें, असें यथार्थानें म्हणतां येईल. हिंदूंची प्राचीन वैदिक संस्कृति पुन्हां लोकांत रूढ करण्यासाठीं विजयनगरचे प्रमुख मंत्री आणि त्या वेळचे शृंगेरीचे शंकराचार्य विद्यारण्यस्वामी ( माधवाचार्य ) यांनीं वेद आणि वेदांगें

**विजयानगर व वैदिक संस्कृतीचें पुनरुज्जीवन**

यांवर स्वतः भाष्यें लिहिलीं व विद्वान् पंडितांकडून लिहविलीं. वेदविद्येची अखेरची मोठी जागृति याच वेळीं झाली. पुढें मराठ्यांच्या अमदानींत शिवाजी राजे व पेशवे यांनीं हिंदु संस्कृति जिवंत ठेवून पुन्हां ती फैलावण्याचा दीर्घ प्रयत्न केला व कांहीं काळ या कामगिरींत यशहि मिळविलें. पण पुढें पाश्चात्य संस्कृतीचे तडाखे बसूं लागले असतां संस्कृति-संवर्धनाचें काम थांबलें व उलट संस्कृतिरक्षणाची जरुरी भासूं लागली.

**भारतीय संस्कृतींची सर्वसंग्राहकता**

भारतीय संस्कृति सर्वसंग्राहक असल्यानें परकीय संस्कृतींशीं तिची गांठ पडतांच त्यांतील चांगले व आकर्षक अंश ती आपल्यात घेते. त्यामुळें इतर संस्कृतींना आपण भारतीय संस्कृतीपेक्षां अधिक चांगल्या आहों हें दाखवितांच येत नाहीं. तसेंच परकीय संस्कृति पचविण्याची क्रिया इतकी सावकाश आणि जुन्या शास्त्राना धरून असते कीं, हिंदु समाज पूर्वींपेक्षांहि कांहीं बदलला असेल अशी कोणाला फारशी कल्पनाहि येत नाहीं. अलेक्झांडरनें जसा हिंदुस्थान पाहिला असेल तसाच आज कोणीहि पाश्चात्य मनुष्य पाहील. म्हणजे सांस्कृतिक दृष्ट्या त्या वेळचा आणि आजचा समाज यांत मोठासा फरक दिसून येणार नाहीं. यामुळें भारतीय संस्कृति अखंडित चालली आहे.

**जगांत पसरलेली हिंदु संस्कृति ओळखण्याच्या खुणा**

हिंदूंची संस्कृति जगांत जी बऱ्याच ठिकाणीं पसरली आहे तिची ओळख आपणाला पुढील गोष्टींवरून होते:(१) संस्कृत भाषेचा पगडा सीलोन, मालदीव, ब्रह्मदेश, मलाया, सुमात्रा, जावादि बेटें, चीन आणि जपान, द्राविड प्रांत वगैरे भागांतील भाषांवर बसला असून त्या भाषांतून संस्कृत ग्रंथांचीं

भाषांतरें आणि रूपांतरें झालेलीं आहेत. या भाषा आर्यन (म्हणजे ज्या कुलांत संस्कृत उत्पन्न झाली त्या) कुलांतील नाहींत म्हणून हा आपल्या भाषेचा त्यांवर असलेला पगडा सहज बसलेला नव्हे, तर लादलेला आहे. (२) हिंदुस्थानातल्याप्रमाणें जाती आणि आचार पेगूंतील तलैंग लोकांत, काचिन लोकांत, आराकानांतील माघ लोकांत, ब्रह्मी लोकांत, काफरी लोकांत, बलुचिस्तानांतील गिचकी लोकांत, इराणांतील लुरी आणि गुदाद लोकांत, आफ्रिकेंतील जुबालंडमधील कांही जातींत व सुमात्रा, कांबोज इत्यादि कांहीं हिंदुस्थानाबाहेरील देशांत आढळून येतात. कांहीं देशांतून आपल्याकडल्याप्रमाणे ब्राह्मण वर्ण आहे. उदाहरणार्थ ब्रह्मदेशांत पावन ब्राह्मण, कांबोजांत बकु किंवा प्राम ब्राह्मण, मलायांत इदान जात, जावाबालिद्वीपांत पादंड. बौद्ध धर्मामुळें सिंहली, जपानी, चिनी, ब्रह्मी इत्यादि लोकांवर सर्वांशींच हिंदु-संस्कृतीचा जबर परिणाम झाला आहे. ( ३ ) हिंदुस्थानाबाहेर पुढील देशांतून बरेच हिंदु लोक वसाहती करून राहिले आहेतः—सिलोन, लखदीव मालदीव बेटें, अंदमाननिकोबार बेटें, ब्रह्मदेश, मलाया, सयाम, लॅंबाक, सेलिबस, फिजी बेटें, मादागास्कर, पूर्व आणि दक्षिण आफ्रिका, ब्रिटिश गियाना, डच गियाना वगैरे देश. या वरील देशांत हिंदु लोकांनीं आपली पूर्वपरंपरागत हिंदु संस्कृति नेऊन रुजविली आहे.

याप्रमाणें भारतीय संस्कृतीचा विकास झाला आहे व होत आहे. या विकासाचीं स्वरूपें विविध आहेत, पण त्यांचा येथें ऊहापोह करण्याचें कारण नाहीं.

---

## प्रकरण ७ वें

# शास्त्रीय आणि प्रादेशिक संशोधन व जगावर युरोपियन सत्तेचा प्रादुर्भाव

भौतिक शास्त्रांचें महत्त्व

मनुष्याला सुख लागण्यासाठीं ज्या सुखसोयी लागत असतात, त्या बहुतेक शास्त्रीय शोधांवरच अवलंबून आहेत. पदार्थ-विज्ञान आणि रसायन हीं दोन शास्त्रेंच बहुधा सर्व शोधांना कारणीभूत आहेत. आगगाड्या व इतर कारखान्यांचीं यंत्रें आणि साधनें यांच्या शोधांना जें ज्ञान लागलें तें वरील शास्त्रांनींच मुख्यत्वेंकरून पुरविलें असें म्हटल्यास फारशी चूक होणार नाहीं. मानव प्राण्याचें आरोग्य तर सर्वांत महत्त्वाचें आहे. कारण तें जर नसेल तर इतर सुखाचीं साधनें काय कामाचीं ? तेव्हां हें आरोग्य देणारें जें वैद्यकशास्त्र त्यांतील बहुतेक सर्व शोध जीवनशास्त्र, प्राणिशास्त्र आणि वनस्पतिशास्त्र यांच्या अध्ययनांचें फल होत. तेव्हां हीं व इतर भौतिक शास्त्रें कशीं निघालीं, प्रथम कोणीं शोधून काढिलीं हें जाणणें अगत्याचें आहे.

प्राचीन काळीं भारतीय, चिनी, अरब आणि ग्रीक लोकांनीं गणित, ज्योतिष, वैद्यक यांसारख्या कांहीं शास्त्रांत प्रगति करून घेतली असली तरी आज जीं भौतिक शास्त्रें प्रचलित आहेत त्यांना या मागील शास्त्रांचा फारसा उपयोग झाला नाहीं. हीं आधुनिक शास्त्रें पंधराव्या शतकापासून पुढें येऊं लागलीं.

शास्त्रीय शोध

सूर्य पृथ्वीभोंवतीं फिरत नसून पृथ्वीच सूर्याभोंवतीं फिरते व ग्रह-मालेच्या केंद्रस्थानीं सूर्य असून तो सर्वांचा चालक आहे हा शोध प्रथम जर्मन ज्योतिषी कोपर्निकस (१४७३-१५४३) यानेंच लाविला; तेव्हां तोच अर्वाचीन ज्योतिष-शास्त्राचा जनक ठरतो. वरील कोपर्निकसचा शोध प्रत्यक्ष डोळ्यांनीं पटवून देण्याकरितां ज्यानें पहिली दुर्बीण तयार केली तो इटालियन गणिती गॅलिलिओ (१५६४–१६४२) पदार्थविज्ञानशास्त्राचा संस्थापक म्हणतां येईल. पण त्या बिचाऱ्याला आपल्या शोधाबद्दल पुराणमतवाद्यांचा छळ सोसावा लागला. पण यापेक्षां जास्त महत्त्वाचे शोध म्हणजे छापण्याची कला व होकायंत्र. कागद करण्याची कला मूळ अरबांची, ती पुढें युरोपांत जाऊन तिनें विद्यावृद्धीला बरेंच चालन दिलें. तरी पण १४ व्या शतकापावेतों चांगला कागद तयार होत नसे. या शतकांत इटलीनें आघाडी मारून जर्मनीला उत्तम कागद करण्याचा धडा घालून दिला. यानंतर लगेंच छापण्याची कलाहि निघाली. ही कलाहि मूळ पौर्वात्यांचीच पण टाईप पाडून छापणें ही अर्वाचीन कला मात्र पाश्चात्त्यांची.

मुद्रणकला

जर्मनींत जॉन गटनबर्ग नांवाच्या माणसानें १४३८ च्या सुमारास उचलतां ठेवतां येणारे टाईप तयार करून जगांत एक मोठी क्रांति घडवून आणली. पुस्तकें बरींच तयार होऊं लागल्यानें तीं स्वस्त मिळूं लागलीं व बरेच लोक वाचूं लागले. यामुळें ज्ञानाचा प्रसार फार झपाट्यानें होऊं लागला व तरवारी पेक्षांहि लेखणीची कदर लोकांना व सरकाराला जास्त वाटूं लागली.

होकायंत्राच्या शोधामुळें खलाशांना समुद्रावर कोठेंहि जाण्याची धास्ती वाटूं लागेनाशी झाली. यामुळें जगांतील दूर-दूरचे लोक एकमेकांना भेटूं लागले व साहजिकच व्यापार आणि दळणवळण वाढलें. याच सुमारास बंदुकीची दारू निघाली. हा शोध मोंगल लोकांनीं चीनमधून पश्चिमेकडे नेला असें म्हणतात. छापण्याची कला आणि होकायंत्र हे शोधहि मूळ चिनी लोकांचेच असें सांगतात. पण खरें काय तें आज नक्की समजत नाहीं. बंदुकीच्या दारूमुळें तर युद्धशास्त्रांत मोठी क्रांति घडून आली व बंदुकांचा उपयोग सर्वत्र सर्रहा होऊं लागला. या बंदुकांपुढें मोठया तटबंदी किल्ल्यांत सुद्धां जीवित सुरक्षित राहूं शकेना. बंदुकांचा प्रभाव पाहून हजारों रानटी लोक मूठभर गोऱ्या लोकांना शरण येऊं लागले. सरंजामी सरदारांची सत्ता बंदुकांमुळें पार मोडली. याप्रमाणें हे नवीन शोध मोठे महत्त्वाचे व परिणामकारक झाले यांत शंका नाहीं.

**बंदुकीची दारू**

प्रादेशिक किंवा भौगोलिक शोध शास्त्रीय शोधांपूर्वीचे असले तरी मध्ययुगानंतर नवीन नवीन भूप्रदेश शोधण्याच्या कामीं शास्त्रीय शोधांचा बराच उपयोग झाला. व्यापार आणि राज्यविस्तार या हेतूनें प्राचीन काळीं लोकांचें एका खंडांतून दुसऱ्या खंडांत जाणेंयेणें होत असे. यात्रेनिमित्त चिनी भिक्षू जसे अनेक संकटें सोसून हिंदुस्थानांत येत तसेंच ख्रिस्ती आणि मुसलमानहि अरबस्तानाला दूरदूरच्या ठिकाणांहून जात. भूमध्यसमुद्राभोंवतीं जीं मिसरी, फिनिशिअन, ग्रीक आणि रोमन हीं राष्ट्रें होऊन गेलीं, त्यांनीं आफ्रिका, आशिया आणि युरोप खंडांचा बहुतेक भाग

**भौगोलिक शोध: अमेरिकाखंड आणि हिंदुस्थानचा जलमार्ग**

परिचित करून घेतला होता. ख्रि. पू. ३३० त पिथिअस नांवाचा एक ग्रीक खलाशी उत्तर ध्रुवापर्यंत जाऊन आला होता. अरब व मोंगल व्यापारी लुटारू आणि मोठे धाडशी असत. नॉर्थ-मेन या चांच्यांनीं तर अमेरिकेपर्यंत वसाहती केल्या होत्या. याप्रमाणें भौगोलिक शोधांचा मागचा इतिहास आढळेल. या शोधांचीं मोठीं चटकदार वर्णनेंहि कांहीं प्रवाशांनीं लिहून ठेविलीं आहेत. तीं वाचून नवीन शोधक उत्पन्न होत. कोलंबसाची गोष्ट अशांच आहे. मार्को पोलो याचे चीनचे प्रवास वाचून त्यालाहि पश्चिम दिशेनें गलबत हांकारून पूर्वेस असलेल्या चीनला पोचतां येईल असा विश्वास वाटूं लागला. त्याच्या वेळच्या सुशिक्षितांप्रमाणें पृथ्वी वाटोळी आहे असें त्याचें ठाम मत झालें होतें. तेव्हां मोठ्या खटपटीनें तो स्पेनहून पश्चिमेकडे निघाला. तो वेस्ट इंडीज बेटांत जाऊन उतरला ( १४९२ ). हाच अमेरिकाखंडाचा युरोपियन लोकांना लागलेला प्रथम शोध होय. याच सुमारास वास्को डि गामा या पोर्तुगीज व्यापाऱ्यानें हिंदुस्थानला जाण्याचा जलमार्ग शोधून काढला. आफ्रिकाखंडाला वळसा घालूनच त्याला हिंदुस्थानचा किनारा गांठतां आला. सुवेझची सामुद्रधुनी पुढें १९ व्या शतकांत तयार झाली. तोंपर्यंत युरोपहून आशियाखंडास जलमार्गानें यावयाचें म्हणजे आफ्रिकेच्या दक्षिणेकडूनच यावें लागत असे. हा जलमार्ग फार लांबचा असला तरी त्या वेळी ईश्वराची मोठीच खैर झाली असें युरोपियन व्यापाऱ्यांना वाटे. कारण खुष्कीचा मार्ग तुर्की लोकांच्या हातीं असून ते फार त्रास देत. तेव्हां नवीन स्वतंत्र मार्ग शोधण्याची फार जरूरी वाटूं लागली होती.

त्या काळची आणखी एक मोठी गोष्ट म्हणजे पृथ्वीप्रदक्षिणा. या धाडसासाठीं मॅगेनल नांवाचा एक पोर्तुगीज खलाशी पांच गलबतें घेऊन निघाला ( १५१९ ). तो अमेरिकेला वळसा घालून गेला. त्याच्या नशिबीं जरी परत स्वदेशीं येण्याचें नव्हतें तरी त्याचें एक गलबत अखेरीस पृथ्वीप्रदक्षिणा करून आलें ( १५२२ ). दोनशेंऐंशी लोक मॅगेलनबरोबर निघाले होते, पण सारे एकतीसच परत आले. यानंतर ड्रेक नांवाच्या इंग्रजानें पृथ्वीप्रदक्षिणेचा प्रयत्न करून पाहिला.

पृथ्वीप्रदक्षिणा

या युरोपियनांच्या धाडसी वृत्तीमुळें आणि समुद्रावर सुरक्षित चालणाऱ्या नवीन गलबतांच्या वाढीमुळें जगाच्या पाठीवर कोठेंहि वसाहत करण्याची बुद्धि साहजिकच त्या लोकांना होऊं लागली. छापील प्रवासवर्णनांची आणि परदेशाच्या भूगोलाचीं पुस्तकें व नकाशे मिळूं लागल्यामुळें तर मोठीच चालना मिळाली. नवीन संशोधिलेलें अमेरिका खंड तर त्यांना पादाक्रांत करण्यास मोकळें होतें. आशियाखंडाशीं व्यापार कसा किफायतशीर असतो याचा प्रत्यक्ष अनुभव होताच.

जगांत युरोपियन वसाहतींना आरंभ

पोर्तुगाल देश हा पूर्वेस स्पेन आणि पश्चिमेस समुद्र असल्याकारणानें खुंटला होता. त्याला तर वाढीची अतिशय इच्छा होती. तेव्हां बाहेरच्या जगावर चाल करून आपल्या राज्याला वसाहती जोडण्याखेरीज गत्यंतरच नव्हतें. त्यांतून पोर्तुगीज लोक अति धाडसी व दर्यावर्दीपणांत कुशल. तेव्हां वास्को डी गामानें हिंदुस्थानचा जलमार्ग शोधून काढल्यावर पोर्तुगालच्या

पोर्तुगीज वसाहती

राजानें साम्राज्य स्थापण्याची तयारी केली. गोव्याहून पोर्तुगीज व्यापारी आणखी पूर्वेकडे सरकत चीनपर्यंत गेले. मॅलाक्का त्यांनीं काबीज केलें व कॅन्टनजवळील मकाव भागांत वसाहत स्थापली. हिंदीमहासागराच्या किनाऱ्यावर त्यांनीं जागजागीं आपलीं ठाणीं ठेवलीं व स्पेननें अमेरिकेंत आपलें साम्राज्य सुरू केलेलें पहातांच पोर्तुगीजहि तिकडे धांवत गेले व हिश्शासाठीं भांडूं लागले. तेव्हां पोपनें या भावंडांत अमेरिका वांटून दिली ! पण पोपचा हा निकाल इतर राष्ट्रें थोडाच मानणार ? इंग्रज, डेन्स, स्वीडीज्, डच व फ्रेंच देखील अमेरिकेवर आपला हक्क सांगूं लागले व एकमेकांशीं भांडूं लागले.

**अमेरिकेंत स्पॅनिश वसाहती**

स्पॅनियर्ड लोकांनीं मेक्सिको आणि पेरू येथील प्राचीन राष्ट्रें व त्यांच्या संस्कृती, त्यांची संपत्ति लुबाडण्यासाठीं ठार केल्या. मेक्सिकोंतील मय संस्कृति बरीच सुधारलेली व फार प्राचीन होती. हिच्यासबंधीं माहिती मागें थोडक्यांत दिलीच आहे. पण युरोपियनांच्या बंदुका, चिलखतें आणि कवाइती सैन्य यांपुढें कोठली पुराणसंस्कृति टिकणार ? अमेरिकेंत सोनें, रुपें विपुल व त्यामुळेंच त्यावर परकीयांचा घाला. स्पॅनियर्डनीं सोनेंरुपें काढण्यासाठीं वसाहती करून खाणी खोदल्या व मूळच्या रानटी लोकांनाच मजूर बनविले. ते जेव्हां बिचारे कष्टानें मरत चालले तेव्हां त्यांच्या जागीं आफ्रिकेंतील नीग्रोंना गुलाम करून आणले. उत्तर अमेरिकेचा बराच भाग, बहुतेक दक्षिण आणि मध्य अमेरिका व वेस्ट इंडीज बेटें हीं स्पेनच्या अंमलाखालीं त्या वेळीं होतीं, व त्यांचा राज्यकारभार वसाहतीच्या पद्धतीवर चालला होता.

सतराव्या अठराव्या शतकांत इंग्रज आणि फ्रेंच यांनींहि वसाहती करण्यास आरंभ करून सर्व राष्ट्रांपेक्षां या कामांत जास्त प्रगति केली. पण युरोपांत या दोन राष्ट्रांमध्यें जी भयंकर तेढ होती तीच सर्वत्र कायम राहून एकमेकांत युद्धें होऊं लागलीं. या वेळीं ब्रिटिशांचें आरमार बलिष्ठ असल्यानें त्यांनीं फ्रेंच वसाहती काबीज केल्या व अमेरिका आणि हिंदुस्थान यांतून फ्रेंचांना हाकलून दिलें.

**इंग्रज आणि फ्रेंच वसाहती**

इकडे उत्तरेस रशिया रुंदावत चालला व पूर्वेकडे वाढूं लागला. रशियाच्या या वाढीचें सर्व श्रेय त्यांतील कोसॅक लोकांना आहे. कोसॅक लोकांची वृत्ति हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवरील अफगाण टोळ्यांसारखी असे. चोर, दरोडेखोर, खुनी, पाखंडी वगैरे गुन्हेगार या राष्ट्रजातींत असत. पण यांच्या अंगच्या शौर्यामुळें रशियन सरकारनें त्यांना लष्करांत घेतलें व त्यांना आशियाखंड पादाक्रांत करून स्वत: त्याचे मालक बनण्यास परवानगी दिली. तेव्हां कोसॅक लोक पूर्वेस देश काबीज करीत करीत पॅसिफिक समुद्राच्या किनाऱ्यापर्यंत पोहोंचले. हा त्यांनीं जिंकलेला प्रदेश सैबेरिया होय.

**आशियांत रशियन वसाहत**

## प्रकरण ८ वें

# औद्योगिक क्रांतीचें युग

सुधारणेची मजा अशी आहे कीं, प्रथम सुधारणा उचलण्यास जितका काळ लागतो त्याच्या शतांशानेंहि पुढें सुधारणेची प्रगति होण्यास लागत नाहीं. प्राचीन पाषाण युगापासून जमीन कसण्याला माणूस लागेपावेतों जितका काळ लोटला, त्यापेक्षां कितीतरी कमी वेळ माणसाला सुधारणेच्या शिखरास पोंचण्यासाठीं लागला. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभापासून यांत्रिक शोधांचा उपयोग प्रत्यक्ष व्यवहारांत होऊं लागला. आगगाड्या, आगबोटी, तारायंत्रें, टेलेफोन, बिनतारी, विद्युत्शक्ति, कोळसा, लोखंड या सर्व साधनांमुळें उद्योगधंद्यांत मोठी क्रांति घडून आली. या क्रांतीची जाणीव समाजांतील अगदीं वरच्या पायरीवरील माणसापासून अगदीं शेवटच्या पायरीवरील माणसापर्यंत सर्वांनाच होऊं लागली. शिवाय या क्रांतीमुळें सर्व जग या टोंकापासून त्या टोंकापर्यंत एकजीव होऊन गेलें. तें इतकें कीं, एका भागांत कांहीं खळबळ उडाली न उडाली कीं पुरे तिचा परिणाम अगदीं दूरच्या भागावरहि होऊं लागला.

सुधारणेची झपाट्यानें प्रगति

आतांपर्यंत जे शास्त्रीय शोध लागले, त्यांचा प्रत्यक्ष व्यवहारांत उपयोग होण्याची वेळ येऊन ठेपली. १७६९ त जेम्स वॉट या इंग्रज शास्त्रज्ञानें वाफेनें चालणारें इंजिन तयार केलें. विश्वांत ज्या ज्या शक्ति आहेत त्यांना माणसांचीं कामें करण्यास लावणें हा माणसाचा निसर्गावर विजयच नव्हे काय ?

वाफेची शक्ति

उष्णतेचें गतींत रूपांतर करून ही गति वाहनें ओढण्यासाठीं खर्च करण्याची वॅाटची कल्पना नंतरच्या संशोधकांनीं उचलून सूत कांतणें व विणणें व आणखी कित्येक कष्टाचीं कामें सहज कमी खर्चांत करणें यांसंबंधीं धडे घालून दिले.

आगगाड्या

रस्त्यावर लांकडी रूळ टाकून त्यांवरून गाड्या चालविण्याचा प्रकार बराच जुना आहे. त्यानंतर खाणींतून बंदरावर कोळसा नेणाऱ्या घोड्यांच्या ट्रॅमगाड्या लोखंडी रुळांवरून चालूं लागल्या. पण पहिली आगगाडी इ. स. १८०४ मध्यें झाली. नंतर दहा वर्षांनीं स्टीफन्सननें जरा जास्त सुधारलेली आगगाडी काढली व हळू हळू तिचा वेग ताशी २४ मैलांपावेतों वाढविला. तेव्हां मात्र लोकांना मोठा आचंबा वाटून या शोधाबद्दल ते नवयुगाचे धन्यवाद गाऊं लागले. ही आगगाडीची युक्ति जगांत सर्व ठिकाणीं पटून जिकडेतिकडे आगगाड्या सुरू झाल्या. यामुळें जगांत भयंकर उलथापालथ झाली. इकडला माल तिकडे जाऊं लागला. तिकडले कधीं न येणारे लोक इकडे येऊं लागले. एका ठिकाणीं जास्त होणारा जिन्नस अनेक ठिकाणीं वांटला जाऊन त्याबद्दल दुसरे जिन्नस येऊं लागले व सर्व ठिकाणीं सर्व जिन्नसा मिळूं लागल्या. याचा मोठा परिणाम व्यापार व उद्योगधंद्यांवर झाला. कोठेंहि दुष्काळाची भीति राहिली नाहीं. ज्ञानाचा फैलाव सर्वत्र सारखा झपाट्यानें होऊं लागला. भिन्न भिन्न संस्कृतींचे लोक एकत्र येऊं लागून राष्ट्रीय जीवन सुलभ झालें. विशेषतः राज्यकर्त्यांना राज्य कितीहि अफाट असो त्याचा कारभार व्यवस्थित करणें सोयीस्कर झालें. याप्रमाणें आगगाडीनें मानवी संस्कृतींत आणि सुधा-

रणेंत केवढी अवर्णनीय भर टाकली याची सविस्तर माहिती देऊं गेल्यास एक मोठा ग्रंथच होईल.

आगबोटी

यासारखीच महती आगबोटीची. तीसुद्धां १९ व्या शतकाच्या पहिल्या दशकांत सुरू झाली. आतां जलप्रवास सुलभ व ठराविक मुदतीचा झाला. नाहींतर पूर्वी इष्ट स्थळीं पोहोंचण्यास किती दिवस लागतील हें सांगतां येत नसे. चीनजपानादि पूर्वेकडील राष्ट्रांचा युरोपशीं फार क्वचित् संबंध येई व त्यामुळें आतांप्रमाणें आशियांतील कच्चा माल तिकडे जात नसे व उलट युरोपमधील भौतिक शास्त्राचें ज्ञान आणि नवविचार यांचा कल्याणप्रद लाभ आशियाला होत नसे. आगबोटीनें आतां चीन व जपान हीं युरोपपासून एका महिन्याच्या अंतरावर आलीं. हिंदुस्थान तर त्याहून जवळ. सुवेझ कालवा १८६९ त उघडला गेल्यापासून आणखी अंतर कमी झालें.

विद्युत् शक्तिः तारा-यंत्रें

वाफेच्या शक्तीनें जमीन आणि पाणी यांवर वेगानें आक्रमण होऊं लागल्याबरोबर आणखीहि एक शक्ति मनुष्याच्या सुखसोयीसाठीं पुढें आली. ती म्हणजे विद्युत्. व्होल्टा, गॅलव्हानी, फॅरेडेप्रभृति शास्त्रज्ञांनीं या शक्तीला संदेशवाहनाचें काम दिलें. तारायंत्राचा उपयोग इ. स. १८३५ पासून होऊं लागला व थोड्याच तासांत दोन दूरदूरच्या खंडांना एकमेकांना बातम्या देतांघेतां येऊं लागल्या. इ. स. १८९६ त मार्कोनी या इटालियन शास्त्रज्ञानें बिनतारी संदेशाची वृत्ति काढली. यामुळें समुद्रांतून वीज नेण्याकरितां तारा घालण्याचें अवघड व खर्चाचें काम वाचूं लागलें.

टेलेफोन

तारायंत्रानें किंवा बिनतारीनें मनुष्याला दुसऱ्यानें दिलेला संदेश त्याच्याच आवाजांत ऐकूं येत नसे. फक्त त्याचें म्हणणें काय तें खुणांच्या द्वारां पत्राप्रमाणें कळत असे. टेलेफोनचा जेव्हां शोध निघाला तेव्हां तर प्रत्यक्ष दुसऱ्याशीं बोलतां येऊं लागले व दुसऱ्याचें बोलणें ऐकूं येऊं लागलें. पुढें पुढें तर तारायंत्रानें लांबचे फोटोहि घेतां येऊं लागले. या सर्व शोधांनीं जग हें एक विश्वकुटुंब करून सोडलें यांत संशय नाहीं. कारण एका शतकापूर्वीं लंडनपासून एडिंबरो जितकें लांब वाटत होतें, त्यापेक्षां या शोधांनीं लंडनपासून मुंबई जवळ आणली.

लोखंड आणि कोळसा

माणसानें या अचाट कर्तृत्वाबरोबरच आणखीहि बरेच विजय मिळविले. ते म्हणजे भूमीवरच्या व भूमींतील द्रव्यांचा आपल्याला पाहिजे तसा उपयोग करून घेणें. १८ व्या शतकापूर्वी लोखंड फारसें मिळत नसून त्याच्या हव्या त्या जिन्नसा करतां येत नसत. पण दगडी कोळशाचा शोध लागून तो वाटेल तितका बाहेर काढतां येऊं लागल्यावर लोखंड वितळवून त्याचे पाहिजे तसे पत्रे बनवितां आले. विजेच्या भट्टयांतून लोखंड वितळविणें सोपें झाल्याकारणानें त्याचीं इंजिनासारखीं यंत्रें चांगलीं होऊं लागलीं. मोठमोठ्या बोटी, पूल, इमारती सामान यांना लागणारें लोखंड व पोलाद थोडया वेळांत व कमी श्रमांत माणसाला मिळण्याची केवढी तरी मोठी सोय झाली व त्यामुळें औद्योगिक क्षेत्रांत कल्पनातीत क्रांति झाली. आज जिकडे पहावें तिकडे लांकडाची जागा लोखंडानें पटकावल्याचें दिसून येईल.

**विमानें**

समुद्रावरून किंवा पाण्यावरून यंत्रशक्तीच्या साहाय्यानें मनुष्य कितीहि जलद गेला तरी त्याचा वेग हवेंतून जाण्यापेक्षां कमीच असणार. शिवाय पृथ्वीच्या पृष्ठभागावर जसे मार्गांत फार अडथळे असतात तसे हवेंत नसणार. तेव्हां पक्ष्यांप्रमाणें हवेंतून उडत जाणें ही कल्पना शास्त्रज्ञांच्या डोक्यांत येऊन त्या दिशेनें प्रयत्न सुरू झाले व इतर प्रयत्नांत जसें यश त्यांना लाभून अखिल मानवजातीवर त्यांचे उपकार झाले तसेंच याहि बाबींत झालें. प्रथम प्रयोगावस्थेंत विमान होतें. पण १९०९ पासून माणसें वाहून नेण्याच्या कामीं त्याचा उपयोग होऊं लागला. आतां तर एका खंडांतून दुसऱ्या खंडांत जाण्यास आगगाड्या, आगबोटींप्रमाणें विमानांचीहि सोय होत आहे.

**जास्त अन्नाचा पुरवठा**

वरील सुखसोयींच्या सुधारणा बाहेरच्या झाल्या. पण मनुष्याचें शरीरपोषण होण्याकरितां जें अन्न लागतें, त्याच्या समृद्धीसाठीं कांहीं नवीन तजवीज झाली होती कीं नाहीं हें पाहिलें पाहिजे. शास्त्रीय शोधांचा ओघ शेतकीकडेहि त्या शतकांत वळला होता व शेतकीचें रसायनशास्त्र ही नवीन शास्त्रीय शाखा देखील निघाली होती. माणसांची संख्या जशी वाढते तशी जमीन कांहीं वाढत नसते. तेव्हां तेवढ्याच जमिनींत जास्त माणसांना पुरेल असें पीक काढण्याची कला हस्तगत करण्याची खटपट झाली व पूर्वीं ज्या ठिकाणीं एकपट पीक निघे त्याच ठिकाणीं चारपांच पट पीक काढण्यांत येऊं लागलें. माणसांच्या आरोग्याकडेहि या काळांत जास्त लक्ष पुरविण्यांत येऊं लागल्याचें दिसून येतें.

व्यापारी चढाओढ

याप्रमाणें अठराव्या आणि एकोणीसाव्या शतकांत शास्त्रीय शोध व तदनुषंगिक औद्योगिक सुधारणा फार झपाट्यानें झाल्या. युरोपांत औद्योगिक क्रांति प्रथम इंग्लंडमध्यें झाली व सर्व जगाला यांत्रिक साधनें पुरविण्याचा मक्ता कांहीं दिवस इंग्लंडकडेच होता. पुढें अमेरिका आणि जर्मनी यानीं इंग्लंडशीं स्पर्धा सुरू केली व आपापल्या राष्ट्रांत जंगी उद्योगधंदे चालविले.

---

## प्रकरण ९ वें

# राजकीय क्रांत्या व लोकशाहीचा उदय

लोकसत्ताक राज्य

सतराव्या अठराव्या शतकांत जगांत सर्व क्षेत्रांतून जशा क्रांत्या झाल्या तशाच राजकीय क्षेत्रांतहि झाल्या. लोक ज्या वेळीं सुधारत चालले त्या वेळीं त्यांना साहजिकच राज्यकारभारांतील गुणदोष दिसून येऊं लागले. सर्व माणसें एकाच दर्जाचीं असून ईश्वरानें त्यांना जे कांहीं जन्मसिद्ध हक्क दिले आहेत त्यांपैकीं प्रमुख म्हणजे जीव जगविणें, स्वतंत्रता राखणें आणि सुखाच्या पाठीमागें लागणें. हे हक्क राजानें सांभाळले पाहिजेत व तो जर सांभाळीत नसेल तर लोकांनीं त्याला दूर सारून जो दुसरा कोणी लोकमताप्रमाणें राज्य करील त्याला राजा करावें, अशा तऱ्हेचे विचार सुशिक्षितांत उद्भूत झाले. इंग्लंडमध्यें चवदाव्या शतकांतच लोकसत्ताक पद्धति अस्तित्वांत आली. पण पुढें सरंजामी पद्धत येऊन तिचें जुलुमी राजसत्तेंत रूपांतर झालें, तेव्हां पुन्हां राज्याचा गाडा आपल्या

हातीं ठेवण्याचा इंग्रजांनीं जिवावर उदार होऊन प्रयत्न केला. ट्यूडर राजघराणें फार बलिष्ठ व अरेराव होतें; तसेंच किंबहुना जास्त जेव्हां त्यामागून आलेलें स्टुअर्ट घराणें बनूं लागलें तेव्हां लोकांनीं राजाशीं युद्ध करून त्याचा शिरच्छेद केला व कांहीं वर्षें प्रजासत्ताक राज्य चालविलें. १६८८ मध्यें पुन्हां राज्यक्रांति होऊन दुसऱ्या एका स्टुअर्ट राजाला लोकांनीं पदच्युत केलें व आपल्याकडे बरेच राजकीय हक्क घेतले. पहिला जॉर्ज हा परकीय राजा जेव्हां गादीवर बसला तेव्हां तर त्याचें मंत्रिमंडळ पार्लमेंटलाच जबाबदार राहिलें व खरे राज्यकर्ते लोकप्रतिनिधीच होते. हीच, राजाचे अधिकार अगदीं नियमित करून सर्व राज्ययंत्र लोकप्रतिनिधींकडे ठेवणारी राजशासनपद्धति सर्वत्र अंमलांत येऊं लागली व ज्या ठिकाणीं तिला विरोध होऊं लागला त्या ठिकाणीं बंडें आणि युद्धें होऊन अशी लोकसत्ताक राज्यपद्धति स्थापन करण्यांत आली.

**अमेरिकेंत राज्यक्रांति**

अठराव्या शतकांत एक युरोपांत आणि दुसरी अमेरिकेंत अशा दोन मोठ्या राज्यक्रांत्या झाल्या व सर्व जुलुमी राष्ट्रांना मोठी दहशत बसली. अमेरिका खंड शोधून काढल्यापासून त्यांत निरनिराळ्या भागांतून निरनिराळ्या राष्ट्रांच्या वसाहती होऊं लागल्या. वसाहती करण्यासाठीं येणारे लोक अगोदरच धाडसी, स्वतंत्र बाण्याचे आणि स्वतः कष्ट करून जमीनजुमला करणारे असत. तेव्हां त्यांच्यावर एखादें युरोपियन राष्ट्र जुलुमी अंमल करूं पाहील तर उलट त्यालाच थप्पड बसल्यावांचून रहावयाची नाहीं.

उत्तर अमेरिकेंत सतराव्या शतकापासून इंग्रज लोक वसाहती करून व मुकाटयानें इंग्लंडची राज्यसत्ता मानून राहिले होते. पण जेव्हां इंग्लंडचा राजा आपल्या पार्लमेंटांत अमेरिकेचे प्रतिनिधी न घेतां उलट तिच्यावर जुलुमी कर बसवूं लागला, तेव्हां मात्र अमेरिकन लोक चिडले व त्यांनीं इंग्लंडची सत्ता युद्ध करून पार झुगारून देण्यासाठीं कंबर बांधली ( १७७५ ). पुढें दहा वर्षे इंग्लंड व अमेरिकेमध्यें युद्ध चाललें होतें व शेवटीं इंग्लंडनें अमेरिकन वसाहतींचें निर्भेळ स्वातंत्र्य कबूल केलें. याच वसाहती पुढें एकत्र होऊन त्यांनीं संयुक्त लोकसत्ताक राज्यपद्धति स्थापन केली. आजची सर्वशक्तिमान् अमेरिका ती हीच होय.

दक्षिण अमेरिकेंतहि स्पॅनिश वसाहतवाल्यांनीं युरोपची सत्ता फेंकून देऊन स्वतंत्र लोकसत्ताक राज्यें स्थापिलीं; पण अनेक अडचणींमुळे उत्तर अमेरिकेंतील संस्थानांप्रमाणें त्यांच्यांत एकी राहिली नाहीं.

**फ्रेंच राज्यक्रांति**

यापेक्षां मोठी व जगाला कायमचें उदाहरण घालून देणारी क्रांति खुद्द युरोपमध्यें वैभवाच्या शिखरास थोड्याच काळापूर्वीं पोहोंचलेल्या फ्रान्स देशांत झाली. चवदावा लुई बादशहा म्हणजे जुलुमी राजांचा राजा व त्यांचा नमुनेदार कित्ता; पुढें झालेल्या नेपोलियनप्रमाणें ती त्याची साम्राज्यतृष्णा व अधिकाराची हांव ! आपल्या मनाप्रमाणें गोष्टी घडवून आणण्यास तो पैशांचा पाऊस पाडी व नीतिमत्तेला कोळून पीत असे. त्याच्या दरबारचें ऐश्वर्य म्हणजे इंद्राच्या नंदनवनाप्रमाणें. सुखोपभोगाचीं अत्युच्च साधनें निर्माण करून तो भोंवतालच्या राजांना आपल्या-

प्रमाणें वागण्यास शिकवी व याप्रमाणें प्रजेला पिळून तिच्या रक्तानें ऐषआराम भोगण्याची इच्छा साहजिकच त्या वेळच्या युरोपियन राजे-रजवाडयांत उत्पन्न झाली. या वेळीं ( अठराव्या शतकाचा पूर्वार्ध ) युरोपांत बेबंदशाही माजली होती. पवित्र रोमन साम्राज्याचा दाब कमी होत जाऊन त्याचा संकोच होत होता. उत्तरेस रशियाचा झार पीटर हा आपली सत्ता फैलावत चालला व लुईप्रमाणें त्यानें सर्व थाट उडवून दिला. युरोपच्या राजकारणांत रशियाला मोठें महत्त्व याच पीटरनें आणून दिलें. त्याच्या शेजारीं प्रशियाचें साम्राज्य उदयास येत होतें व आपल्या विजयांमुळें त्यानें युरोपियन राष्ट्रांत बराच मोठा दर्जा मिळविला होता. लुई आणि पीटर यांप्रमाणेंच प्रशियाचा बादशहा फ्रेडरिक (१७४०-८६) हें त्या काळीं मोठें प्रस्थ होतें. त्याचा डोळा ऑस्ट्रियाला बुडवून आपण पवित्र रोमन सम्राट् होण्याकडे होता. तेव्हां त्यासाठीं युरोपांत युद्धें सुरू होऊन इंग्लंडखेरीज बाकीच्या कोणाहि राष्ट्राला बाहेर साम्राज्य वाढविण्यास व तें राखण्यास फुरसत मिळाली नाहीं.

**फ्रेंच राज्यक्रांतीचीं कारणें**

चवदाव्या लुईच्या अरेरावीमुळें फ्रान्समध्यें सरंजामपद्धति मोडल्यासारखी झाली, तरी सरदार लोक लोकांकडून कर व बलुतीं घेतच. शिवाय सर्व सरंजामी सरदार राजाच्या दरबारांत मोठमोठया जागांवर असल्यामुळें त्यांच्या विरुद्ध कागाळी ऐकलीच जात नसे. फ्रान्समध्यें श्रीमंतांची व सरदारांची एक स्वतंत्र जातच बनल्यासारखी झाली होती. कारण जो जन्मानें उच्च घराण्यांतला नाहीं तो कधींहि सरकार दरबारांत जाऊं शकत नसे. त्यामुळें गरीब आणि श्रीमंत यांच्यांतील सामाजिक आणि

राजकीय अंतर वाढत चाललें होतें. फ्रान्समधील जनता अगदीं अडाणी व दरिद्री स्थितींत ठेवण्यांत आली असून तशांतून त्यांच्यावर एकसारखे जुलूम होत. तेव्हां लोक राजदरबार आणि सरदार यांना अगदीं पाण्यांत पाहात व त्यांचा नायनाट करण्याची संधि ईश्वरानें आणावी असें इच्छीत. त्यांच्यांतील विद्वान् पुढारी त्यांना आंतून बंड करण्यासहि प्रोत्साहन देत. तेव्हां फ्रान्समधील अत्यंत जुलमी राजसत्ता कधीं एकदम उलथून पडेल याचा नेम राहिला नव्हता. सोळावा लुई जेव्हां पैशांच्या पेचांत आला तेव्हां त्यानें लोकप्रतिनिधींचें राज्य-कारभारांत साहाय्य घेण्याचें ठरविलें. पण लोक इतके खवळले होते कीं, त्यांनीं सबंधच राज्यसत्ता हातांत घेण्याचा बंड करून प्रयत्न केला व तो साधलाहि. हातांत सत्ता आल्याबरोबर त्यांनीं राजेरजवाडे, सरदारदरकदार, वतनदार वगैरे सर्वांचा निःपात करण्याचा सपाटा चालविला. खुद्द राजा आणि राणी यांना फांसावर लटकाविलें व समतेचें निशाण उभारलें. जगांत जर कोणाला जुलमी सत्ता झुगारून द्यावयाची असेल तर आम्ही सर्वस्वीं त्याला मदत करूं, असा फ्रेंच लोकशाहीनें जाहीरनामा लावला. युरोपांत ऑस्ट्रिया आणि प्रशिया हीं राष्ट्रें फ्रेंच लोकशाहीला दडपून टाकण्याचा प्रयत्न करीत होतीं म्हणून त्यांच्यावर तिनें मोहीम काढली.

**फ्रेंच लोकशाही**

या क्रांतीच्या अमदानींत लोकप्रतिनिधींनीं फ्रान्समधील लोकांना जाचक व गरिबांच्या उन्नतिमार्गांत आड येणाऱ्या सर्व गोष्टी बंद केल्या. नवीन कायदेकानू केले व राज्यकारभार लोकमतानुवर्ती चालेल अशी सुधारणा केली. लोक-

शाहीचा हा प्रयोग अगदीं नवीन असल्यामुळें कांहीं काळपर्यंत बऱ्याच चुका होत गेल्या व पुढें अनुभवानें जी एकदां घडी बसली ती अद्याप कायम आहे.

फ्रान्समधील बहुतेक तरुण पिढी आपल्या कर्तबगारीला वाव मिळाला म्हणून आनंदली व तिनें लष्करी शिक्षण घेऊन फ्रान्सचा दिग्विजय करण्याचा विडा उचलला. इंग्लंडखेरीज युरोपांतील सर्व राष्ट्रें या नवीन सत्तेपुढें नमलीं व केवळ समुद्रावरच्या अद्वितीय साम्राज्यामुळें इंग्लंडला या बेफाम झालेल्या फ्रान्सशीं टक्कर देऊन त्याला नामोहरम करतां आलें.

नेपोलियन

रोमन लोकशाहींतील सीझरप्रमाणें फ्रेंच लोकशाहींत नेपोलियन वीर पुढें आला व त्यानें कांहीं काळ जगाला दिपवून सोडलें. रोमनें सीझरला ज्याप्रमाणें राजमुकूट अर्पण केला होता त्याचप्रमाणें फ्रान्सनेंहि नेपोलियनला तो अर्पण केला व यानेंहि सीझरप्रमाणें न नाकारतां तो दहा वर्षे मोठ्या दिमाखानें आणि ऐश्वर्यानें धारण केला. यावरून असें सिद्ध झालें कीं, फ्रान्स हें लोकशाहीला पात्र नव्हतें किंवा त्याला तिची फारशी आवडहि नव्हती. फ्रान्सला फक्त ऐश्वर्य आणि दिमाख पाहिजे होता व तो जो देईल त्याच्या अंकित रहाण्यास फ्रान्स कबूल होता. तथापि फ्रान्सनें युरोपांत लोकशाहीचें बीज जें खोल रुजविलें त्याला एका शतकानें पुन्हां चांगले जोमदार अंकुर फुटून गत महायुद्धांत जिकडे-तिकडे लोकशाह्या निर्माण झाल्या व आजहि स्पेन देशांतल्याप्रमाणें उरलेल्या राजशाह्या विराम पावण्याच्या पंथांत आहेत.

## राजकीय क्रांत्या व लोकशाहीचा उदय

नेपोलियन ही जगांतील एक संस्मरणीय विभूति होय. अचाट लष्करी बुद्धिसामर्थ्याबरोबरच त्याच्या ठिकाणीं मुत्सद्दीपणाहि होता. त्यानें जें पीनल कोड केलें आहे तें एकटें देखील त्याचें नांव अजरामर करील. तथापि त्यानें आपली दैवी प्रतिभा आणि पराक्रम हीं स्वार्थासाठीं खर्च केल्यामुळें त्याच्या कीर्तीला काळिमा लागला आहे; व हाच कमालीचा स्वार्थ त्याच्या व त्याच्या राष्ट्राच्या नाशास कारणीभूत झाला. वाइटांतूनहि चांगलें जसें निघतें तसें त्याच्या कृतींपासून युरोपखंडांत कांहीं हितकारक सुधारणांचें बीज पडून रुजलें गेलें. लोकसमाजाला न्यायानें वागविणें आणि उदारबुद्धीनें राज्य चालविणें हा धडा युरोपियन राष्ट्रांनीं यापुढें उचलला. नेपोलियनचा सर्व युरोपियन राष्ट्रांनीं एकत्र होऊन पाडाव केल्यानंतर या राष्ट्रसंघानें युरोपची जेव्हां पुनर्रचना केली तेव्हां त्यांनीं जुनीं जुलमी राज्यतंत्रें पुन्हां ठेविलीं नाहींत, तर नेपोलियनच्या अमदानींत लोकांच्या मनांत उदार राजकारणाची जी कल्पना ठसली होती, तिलाच अनुसरून राज्य चालविण्याचें धोरण आंखलें. जर्मनी आणि इटली या देशांतील लहान लहान संस्थानी राज्यें मोडून त्यांचें एक राष्ट्र करण्याला नेपोलियननें मदत केली. म्हणजे आजची जर्मनी आणि इटली नेपोलियननें रचलीं.

**राष्ट्रसंघाचा अवतार**

सर्व जगाची शांति मुद्दाम आपल्या एकट्याच्या हितासाठीं मोडण्यास जेव्हां नेपोलियन उठला, तेव्हां सर्व राष्ट्रांनीं जगाच्या शांतीप्रीत्यर्थ एकजूट केली. आजच्या राष्ट्रसंघाचाच हा लहानसा अवतार म्हणतां येईल. यानें त्या वेळी युरोपांत शांतता प्रस्थापित करण्यांत चांगलें यश मिळविलें.

आतां नेपोलियनच्या पाडावानंतर एकोणिसाव्या शतकांत युरोपियन राष्ट्रांनीं सर्व खंडांतून आपल्या वसाहती करून बहुतेक जग युरोपियन सत्तेखालीं कसें आणलें तें पाहूं.

**पौर्वात्य आणि पाश्चात्य संस्कृतींचा लढा**

हिंदुस्थानांतील इतर वसाहती बुडवून इंग्रज व्यापाऱ्यांनीं आपली व्यापारी दृष्टि बाजूला ठेवली व राज्यकमाईला सुरुवात केली. त्या कामांत त्यांना इतकें यश आलें कीं, अर्ध्या शतकाच्या आंतच बहुतेक हिंदुस्थान त्यांच्या ताब्यांत आलें. फक्त मराठे आणि शीख या दोन राष्ट्रांशीं झुंजण्यास इंग्रजांना बरीच शक्ति खर्च करावी लागली. वास्तविक युरोपियन लोकांनीं युरोपियनेतर लोकांवर जे विजय मिळविले त्यांचें मुख्य कारण असें कीं, युरोपियनांना भौतिक शास्त्रीय साधनांचा चांगलाच पाठिंबा असून हीं साधनें युरोपच्या बाहेर फारशीं अवगत नव्हतीं. युरोपियन किंवा पाश्चात्य संस्कृतीचा लढा हिंदुस्थानच्या रणभूमीवर भारतीय संस्कृतीशीं जेव्हां लागला तेव्हां भौतिक शास्त्रांत अगदीं अज्ञानी अशा भारतीयांचा शास्त्रज्ञ युरोपियनांनीं सहजासहजीं पाडाव केला. चीन, जपान व आशियाखंडाच्या पश्चिमेकडील मुसलमानी राष्ट्रें यांच्यावरहि युरोपियनांनीं जें वर्चस्व गाजविलें त्यांतील रहस्यहि यांतच आहे. असो.

इ. स. १८५८ पासून हिंदुस्थान हा ब्रिटिश साम्राज्याचा एक भाग बनला व तेव्हांपासून इंग्लंड यावर प्रत्यक्ष राज्य करतें. ब्रिटिश अमदानीपासून सर्व शास्त्रीय शोधांचे फायदे या देशाला मिळत आहेत. लोक अधिक साक्षर होत चालले आहेत व त्यांच्यांत राष्ट्रीय भावनाहि जागृत झाली आहे.

सर्व पूर्वेकडील राष्ट्रांत जपाननें मात्र आपली स्वत:ची प्रगति गेल्या पाऊणशें वर्षांत करून घेतली. सोळाव्या शतकापासून युरोपियन मिशनरी व व्यापारी चीन-जपानवर हल्ले करूं लागले. तेव्हां जपान जागा होऊन त्यानें दोनशें वर्षेपर्यंत परकीयांना आपल्या भूमीवर पाय ठेवूं दिला नाहीं. पण पुढें १८५७ पासून पुन्हां अमेरिकन, रशियन, डच, ब्रिटन इत्यादि लोकांचा उपसर्ग पोहोंचूं लागल्याकारणानें जपाननें युरोपांतील सर्व सुधारणा अंगिकारून मोठया झपाट्यानें युरोपियन राष्ट्रांच्या बरोबरीनें आपली प्रगति करून घेतली व आशियाखंडाचें नांव राखिलें. शेजारच्या अडाणी चीनचा त्यानें पराभव केला यांत नवल नाहीं, पण चालू शतकाच्या आरंभीं अरेराव रशियालाहि आपल्या थोडया सैन्यानिशीं नामोहरम केलें. आज आशियांतील इतर राष्ट्रें हें जपानचें उदाहरण पाहून आपलींहि तशीच प्रगति करून घेत आहेत.

जपानचा अभ्युदय

आफ्रिका खंड युरोपच्या अगदीं शेजारीं आहे व प्राचीन काळीं भूमध्यकिनाऱ्यावरील प्रदेश पलीकडल्या किनाऱ्यावरील युरोपियन राष्ट्रांशीं अगदीं संबद्ध होते. पण १८५० पर्यंत मध्य व दक्षिण आफ्रिका हीं कोणालाच परिचित नव्हतीं. तींतील लोक अगदीं रानटी व सुधारणेच्या अगदीं प्राथमिक अवस्थेंत म्हणजे पशूंप्रमाणें होते. नंतर धाडसी प्रवासी, व्यापारी, शास्त्रज्ञ आणि संशोधक यांचे तांडे तिकडे जाऊन त्यांनीं हा अंधारी प्रदेश उजेडांत आणिला. तेव्हां मात्र सर्व सुधारलेल्या जगाचे याकडे डोळे लागले. आफ्रिकेंतील सर्वच गोष्टी विलक्षण व आकर्षक वाटूं

आफ्रिकेंत युरोपियन वसाहती

लागल्या. लगेंच युरोपियन राष्ट्रांचे यावर हल्ले सुरू झाले व पन्नास वर्षांच्या आंतच बहुतेक आफ्रिका युरोपियनांची वसाहत झाली. त्यापूर्वी आफ्रिकें-तील नीग्रो लोकांना अरब व्यापारी गुलाम म्हणून विकीत. अमेरिकेंत हे नीग्रो गुलाम म्हणूनच गेले व आज युरोपिनांशीं स्पर्धा करूं लागले आहेत.

ऑस्ट्रेलिया खंडांत वसाहती

ऑस्ट्रेलिया खंडाचा इतिहास असाच आहे. इ. स. १७६८ ते १७७९ पर्यंत कॅप्टन् कुकनें ऑस्ट्रेलिया आणि न्यू झीलंड शोधून काढून ब्रिटिशांचें त्यांवर निशाण रोविलें. प्रथम कांहीं दिवस गुन्हेगार लोक या ठिकाणीं काळ्या पाण्या-वर म्हणून पाठवीत; पण पुढें जेव्हां येथील कुरणें फार चांगलीं आहेत असें कळलें, तेव्हां युरोपियन धनगर-शेतकरी येथें वसाहती करूं लागले व त्यांनीं गुन्हेगार येण्याचें बंद करविलें. लवकरच इ. स. १८५१ त सोन्याच्या खाणींचा जेव्हां शोध लागला तेव्हां तर इंग्रज लोकाच्या झुंडीच्या झुंडी लोटूं लागल्या व १८५० च्या सुमारास या वसाहत-वाल्यांच्या टासमानिया आणि न्यू झीलंड धरून सात स्वतंत्र वसाहती पडल्या. १९०१ मध्यें या सर्वांचें एकीकरण होऊन एक ऑस्ट्रेलियन प्रजासत्ताक राष्ट्र बनलें. यावर इंग्लंडची सत्ता नांवाला आहे, पण ब्रिटिश साम्राज्याचा एक महत्त्वाचा घटक म्हणून त्याला मोठा मान आहे !

ऑस्ट्रेलियाप्रमाणें कानडाहि साम्राज्याचा एक मोठा भाग आहे. बाकीची अमेरिका कांहीं स्वतंत्र व कांहीं युरोपियन राष्ट्रांची मांडलिक आहे.

याप्रमाणें बहुतेक सर्व जगावर युरोपियन सत्ता पसरली असून, ब्रिटिश साम्राज्यावर तर सूर्य कधींहि मावळत नाहीं, हें विधान

चुकीचें नाहीं. कारण सर्वच खंडांतून या साम्राज्याचीं अंगें विखुरलीं आहेत.

परदेशगमनाची आवश्यकता

आतां युरोपियन लोकांनाच दूरवर जाऊन वसाहती करण्याची व राज्यें जिंकण्याची कां आवश्यकता वाटली असा प्रश्न पुढें येतो. १९व्या शतकांत युरोपची लोकसंख्या वाढून लोकांना खावयास हवें तसें स्वदेशांत मिळणें मुष्किलीचें पडे. शिवाय पौर्वात्य लोकांपेक्षां हे लोक ऐहिक सुखाचा लाभ करून घेण्यास धाडसहि करीत व परदेशांतहि मजेनें रहात. आणि युरोपला कच्च्या मालाचीहि फार जरूरी होती. त्याविना कारखाने बंद पडून एकंदर आर्थिक अवनति होण्याचा प्रसंग आला होता. नवीन संशोधलेल्या खंडांतून सोन्यारुप्यांच्या खाणी त्यांची वाट पहात होत्या. तेव्हां स्वदेशांत सर्वांनी हाल भोगण्यापेक्षां कांहींनीं दूरवर जाऊन वसाहती कराव्या व स्वजनांना मदत करावी. हें धोरण निःसंशय प्रशंसनीय होतें. इंग्लंड गेल्या शतकांत समुद्राची स्वामिनीहि होती. तेव्हां आपल्या पुत्रांना सुखरूप परदेशाच्या किनाऱ्यावर सोडण्यास व परत आणण्यास तिला कांहींच त्रास नव्हता. तशांतून वाफेच्या बोटी व आगगाड्या सुरू झालेल्या. मग युरोपची लोकसंख्या पातळ करण्यास काय उशीर होता ?

## प्रकरण १० वें

# नवविचारप्रवर्तक युग

विश्वबंधुत्व

मागील एका प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें नवीन शास्त्रीय शोध व त्यांचा मनुष्याच्या आयुष्यक्रमांत दरघडी होणारा उपयोग यांमुळें सर्व जगांतील माणसांची रहाणी सामान्यत: एकसारखी होत चालली आहे. याचा मोठा परिणाम म्हणजे एवढें अफाट जग पण तें एक होत चाललें आहे; आगगाड्या, आगबोटी, तारा, विमानें, वृत्तपत्रें वगैरे दळणवळणांचीं साधनें अतिशय वाढलीं असल्यानें कोठल्याहि जगांतील कोपऱ्याचा माणूस अगदीं विरुद्ध कोपऱ्याच्या माणसाशीं व्यवहार करूं शकतो. जपानमध्यें मोठा भूकंप होऊन लोकांचे हाल होऊं लागले तर युरोपांतून लगेच त्यांना मदत जाते. लढाईंतून शत्रुपक्षाकडील जखमी सैनिकांची सुद्धां आपल्या माणसांप्रमाणें शुश्रूषा करण्यांत येते. पूर्वीं आफ्रिकन नीग्रो किंवा अमेरिकन रेड इंडियन यांच्या जिवाची युरोपियन वसाहतवाल्यांना मुळींच फिकीर नसे. गुलामगिरी दुसऱ्यावर लादण्यांत त्यांना कांहींहि वाटत नसे. पण याच गोऱ्या लोकांच्या उदारमतवादी बांधवांनीं मोठी चळवळ करून व पाण्यासारखा पैसा ओतून गुलामगिरीचें पूर्ण उच्चाटण केलें. म्हणजे फक्त आपल्याच राष्ट्रांतील जे रहिवासी ते आपले बांधव व इतर राष्ट्रांतील लोक हे परके हा भेदभाव सुशिक्षित लोकांत कमी कमी होत चालला. जगांत कोठें कां अन्याय होईना त्याचा निषेध करून तो दूर करण्यासाठीं उदारमतवादी राष्ट्रांची निरपेक्ष खटपट

चालूं असलेली दिसून येते. त्यामुळें कोणतेंहि सरकार विनाकारण अन्याय किंवा जुलूम करण्यास धजावत नाहीं. विश्वबंधुत्वाच्या दृष्टीनें हा आजच्या सुसंस्कृत व्यक्तींमध्यें पडलेला फरक एखादेंच राष्ट्र घेऊन पाहिलें असतां चटदिशीं नजरेंत भरतो.

**हिंदुस्थानांत एक-राष्ट्रीय भावना**

आपल्याच भरतखंडाकडे नजर टाकल्यास, इंग्रजी अमदानीपूर्वी प्रांताप्रांतांतून सलोखा मुळींच नव्हता. उलट एका प्रांतांतील लोक दुसऱ्या प्रांतांतील लोकांचे कट्टे शत्रू असें कटु सत्य अनुभवास येई. तसेंच देशाभिमानाची वृत्ति किंवा राष्ट्रीय भावना ही पूर्वी कमी किंवा मुळीं नव्हती असें म्हणल्यास फारसें चुकीचें होणार नाहीं. आपल्या स्वार्थासाठीं राष्ट्राला गुलामगिरींत ढकलण्याचीहि कांहीं लोकांची तयारी असे. तेव्हां अशा काळांत सबंध हिंदुस्थानाकरितां आपण कांहीं हातपाय हलवावे किंवा परप्रांतांतील लोकांना त्यांच्या संकटाच्या प्रसंगीं मदत करावी अशी बुद्धि कांहीं बोटांवर मोजण्याइतक्या महात्म्यांखेरीज इतरांना होणें शक्य नव्हतें. पण आज तो मनु पालटला आहे. सर्वच प्रांतांवर एकच ब्रिटिश अंमल गाजत असल्यानें जरी हा फरक पडला आहे, तथापि नवीन क्रांतिकारक विचारांचा पगडा सुशिक्षित हिंदी लोकांवर बसल्यामुळें ही एकराष्ट्रीयत्वाची भावना त्यांच्यांत उत्पन्न झाली हें म्हणणें बहुंशीं खरें आहे.

माझा हिंदुस्थान, बंगाली किंवा पंजाबी लोकांवरचीं संकटें तीं माझींच संकटें, माझ्या उत्कृष्ट मराठी भाषेप्रमाणेंच बंगाली किंवा हिंदी भाषा उत्कृष्ट आहे, मी जसा माझ्या मराठे लोकांकरितां खपेन

तसाच हिंदी लोकांकरितांहि खपेन; यांसारखे विचार आधुनिक महाराष्ट्रीय सुशिक्षित तरुणांच्या मनांत घोळत असतात. प्रथम आपलें कुटुंब, नंतर आपला समाज, नंतर स्वदेश व शेवटीं सर्व जग अशा एकराष्ट्रीयत्वाच्या विचारांतील पायऱ्या आहेत; अगदीं वरच्या पायरीवर पोहोंचला कीं, तो विश्वकुटुंबांतील एक भागीदार झालाच.

**समाजसत्तावाद**

अशा विश्वकुटुंबाची स्थापना करूं पहाणारा एक वर्ग आज जगांत वर डोकें काढीत आहे. विश्वकुटुंब बनविण्यासाठीं समाजांतील उच्चनीच भाव नाहींसा केला पाहिजे. म्हणजे प्रत्येकजण फक्त समाजाचा सेवक, त्यानें आपल्या मगदुराप्रमाणें नेमलेलें काम करावें व समाज देईल तें वेतन घ्यावें. स्वत:च्या मालकीची अशी इस्टेट करितां कामा नये. कोणाला कष्ट केल्याशिवाय पोटाला व चैनीकरितां पैसा मिळूं नये. सर्व धंदे, जमिनी व उत्पन्न सबंध समाजाचें. अशा समाजानें कुटुंबांतल्या कर्त्या पुरुषांप्रमाणें लहान मुलें, वृद्ध माणसें, दुर्बल आणि व्यंगें असणाऱ्या व्यक्तींची नीट जोपासना करावी व एकंदर समाजाच्या सुखाकडे व उन्नतीकडे पूर्णपणें लक्ष द्यावें. याप्रमाणें समाजसत्तावाद्यांचीं तत्त्वें आहेत व आज रशियांत याच तत्त्वांची अंमलबजावणी करणारें सरकार आहे.

**रशियन कम्युनिस्ट व समाजसत्ता**

अठराव्या शतकाच्या अखेरीस फ्रान्सची राज्यसत्ता उलथून पाडून स्वातंत्र्याचें आणि समतेचे निशाण उभारणाऱ्या फ्रेंच क्रांतिकारकांनीं ज्याप्रमाणें विश्वबंधुत्वाचें ध्येय पुढें ठेवलें होतें, त्याप्रमाणें रशियन कम्युनिस्टांनीं सर्व जगाला

भांडवलशाही आणि साम्राज्यशाही यांतून मुक्त करण्याचें ध्येय ठेविलें आहे व त्या दिशेनें त्यांनीं प्रयत्नहि चालविले आहेत. या समाजसत्तावादामुळें राज्ययंत्राच्या घटनेंत मोठी क्रांति होऊं पहात आहे. ज्यांना जिंकलें त्या लोकांवर कितीहि जुलूम केला तरी त्याबद्दल जेत्यांना पूर्वीं कोणी विचारणारा नसे. पण गेल्या महायुद्धापासून स्वयंनिर्णयाचें अत्यंत उदार तत्त्व पुढें आलें असून जित लोकांच्या संमतीनेंच राज्यकारभार चालला पाहिजे अशी विचारसरणी सुसंस्कृत राष्ट्रांत बळावली आहे.

स्त्रीस्वातंत्र्य

स्त्रीस्वातंत्र्यासंबंधीं अशीच सुधारलेली विचारसरणी आहे. आतांपावेतों स्त्रियांना बाजूला ठेवून सर्व महत्त्वाचे व्यवहार चालत असत. स्त्रीचें अस्तित्व फक्त उंबऱ्याच्या आंत भासे, व समाजकारण किंवा राजकारण यांत स्त्रियांची सल्ला घेण्याची कल्पनाहि पुरुषांच्या मनांत येत नसे. पण आज युरोपांत तरी स्त्रिया आणि पुरुष यांत फारसा भेद राहिला नाहीं. स्त्रियांना अमुक एक काम करितां यावयाचें नाहीं असें नाहीं. तिकडे स्त्रिया पार्लमेंटांत सभासद म्हणून बसतात, मोठमोठ्या हुद्यांचीं जबाबदारीचीं कामें पार पाडतात, शास्त्रीय संशोधनासारखे नीरस आणि किचकट विषयहि हस्तगत करतात, विद्वन्मान्य ग्रंथ रचतात, मर्दानी खेळ खेळतात, विमानें सुद्धां चालवितात. गेल्या शतकापासून युरोपांत जो उदारमतवाद प्रचलित झाला त्यानेंच मुख्यतः स्त्रियांना स्वातंत्र्य मिळवून दिलें. राष्ट्राची उन्नति करण्यास प्रत्येक व्यक्तिमात्राची उन्नति प्रथम हवी असते; व व्यक्तीस मोकळें ठेवून जबाबदारीनें कामें कर_

ण्यास वाव ठेवला तरच तिची उन्नति शक्य आहे. तेव्हां स्त्रियांना पुरुषांबरोबरीनें राष्ट्रहिताचीं कामें करतां येण्यास त्यांची उन्नति घडवून आणली पाहिजे व त्यासाठीं प्रथम त्यांना स्वातंत्र्य दिलें पाहिजे. उदारमतवाद्यांचीं हीं तत्त्वें सर्व सुधारलेल्या जगास पटलीं आहेत व युरोपाबाहेरच्या स्त्रियाहि हळू हळू सुधारणेच्या मार्गांत येत आहेत.

स्वावलंबी स्त्रीशिक्षण

हें स्त्रियांचें स्वातंत्र्य टिकून रहाण्यासाठीं त्यांना स्वावलंबनी बनविणें अवश्य आहे. तेव्हां त्यांना जें शिक्षण द्यावयाचें तें पोषाखी असतां कामा नये, तर त्यापासून त्यांना पोटाला—वेळ पडल्यास, मिळवितां आलें पाहिजे. अशी दृष्टि सर्व युरोपियन राष्ट्रांनीं ठेविलेली दिसून येते. कामगार स्त्रियांना बालसंगोपन नीट करतां येणार नाहीं म्हणून लेंकुरवाळ्या स्त्रियांना कारखान्यांतून बऱ्याच सवलती देण्यांत येत असतात. स्त्री ही पुरुषाची दासी नसून ती समाजाची सेविका आहे व पुरुषाप्रमाणेंच सर्व बाबतींत स्वतंत्र आहे ही पुरुषवर्गाला शिकवण आधुनिक संस्कृतीनें दिलेली आहे.

बौद्धिक सुधारणा, सक्तीचें शिक्षण

सर्व सुधारणांची गुरुकिल्ली बौद्धिक सुधारणेच्या हातीं असते. शिक्षणानेंच मनुष्याची दृष्टि फांकून त्याला नवीन नवीन समाजहितकारक विचार सुचतात. ज्या राष्ट्रांत बहुजनसमाज निरक्षर आहे, तें राष्ट्र कांहीं केलें तरी दुर्बलच रहाणार. हा विचार अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत प्रशियाचा बादशहा फ्रेडरिक दि ग्रेट याच्या डोक्यांत येऊन त्यानें देशांत सक्तीचें शिक्षण सुरू केलें. याचा परिणाम असा झाला कीं, आज जर्मनींत

कोणताहि पुरुष किंवा स्त्री निरक्षर आढळणार नाहीं. जर्मनीचें बळ या अखिल साक्षरतेंतच आहे. जर्मनीचें हें उदाहरण बाकीच्या युरोपियन राष्ट्रांनीं गिरवून, युरोपखंडाला सुधारणेचा पहिला मान प्राप्त करून दिला आहे.

**शिक्षणवाढीचा परिणाम**

लोकांत शिक्षणाचा प्रसार होत चालल्यामुळें स्वतंत्र विचारांची व शोधांची मालिका सुरू झाली. पोपची धार्मिक सत्ता संपुष्टांत आणण्यास शिक्षणाची वाढच कारणीभूत झाली. शुद्ध तर्काला न पटणाऱ्या व भौतिक शास्त्रांच्या ऐरणीवर न ठरणाऱ्या जुन्या भोळ्या कल्पनांना आणि वागणुकीला सुशिक्षितांत थारा मिळेनासा झाला व नवीन 'सुधारक' समाज तयार झाला. उदारमतवाद आणि सदनशीर व्यवहार यांकडे पूर्ण दृष्टि वळून राज्यकारभाराचें धोरणच पार बदलून गेलें. अशिक्षित मजुरापेक्षां साक्षर मजूर जास्त चलाख आणि उपयोगी असतो, असा अनुभव येऊं लागला. या कारणानें बहुजनसमाजाला साक्षर करण्याला लागणारा पैसा वांया जात नसून राष्ट्राच्या सर्वांगीण उन्नतींत त्याची भरपाई मिळते ही खात्री सर्व जगास पटली.

**वर्तमानपत्रें व लोकजागृति**

जगांत शिक्षणाची वाढ करण्याच्या कामीं वर्तमानपत्रांचा फार उपयोग झाला. अठराव्या शतकाच्या प्रथम दशकांत लंडन येथें एक वर्तमानपत्र निघालें. पुढें लवकरच वर्तमानपत्रांची सांथ युरोप अमेरिकेंत पसरली. ती इतकी कीं, दोनशें वर्षांत नुसत्या अमेरिकेंतच वीस हजारांवर पत्रें निघूं लागलीं. लोकजागृति हेंच वर्तमानपत्राचें मुख्य ध्येय असतें. आपले विचार उघड

आणि स्पष्टपणें सरकारपुढें मांडण्याला साधन आज एकच आहे व तें म्हणजे वर्तमानपत्र. या साधनाचा सरकारालाहि दरारा वाटतो व सरकार उदार आहे कीं जुलमी आहे हें ठरविण्याचें सुधारलेलें गमक म्हणजे वर्तमानपत्रांचें स्वातंत्र्य किंवा मुस्कटदाबी. या वृत्तपत्रांमुळें जगांतील एकूण एक भाग एकमेकांना जोडले जातात व यामुळें एक-मेकांत स्नेहभाव वाढतो. विश्वकुटुंब बनविण्याचा कामीं वृत्तपत्रांचा अतिशयच उपयोग होतो.

**मानवी स्वातंत्र्य व व्यक्तिस्वातंत्र्य**

मागील सर्व विचारक्रांतीवरून असें दिसून येईल कीं, मानवी स्वातंत्र्याचीच एकंदरीनें फार प्रगति झालेली आहे. एकीकडे मनुष्य निसर्गावर ताबा चालवूं पहातो व दुसरीकडे तो सामाजिक आणि राजकीय पारतंत्र्यापासून मुक्त होऊं पहातो. पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश या पंचमहाभूतांवर मनुष्याची सत्ता चालत नाहीं असा आजवर समज होता; पण आग-गाड्या, आगबोटी, विमानें, विद्युद्यंत्रें वगैरे साधनांनीं या निसर्गदेवतां-वर सुद्धां मनुष्य हुकुमत गाजवितांना दिसतो. तसेंच व्यक्तिस्वातंत्र्य हेंच समाजोन्नतीचें ध्येय ठरविण्यांत आलें असून ते ध्येय गांठण्यासाठीं समाजाचें नियमन होत आहे. मनुष्य रानटी अवस्थेंतून बाहेर पडून समाज करून जेव्हां राहूं लागला तेव्हां त्यानें जें स्वातंत्र्य गमावलें तें हळू हळू परत मिळविण्याचा प्रयत्न आज अनेक शतकें चालला आहे. पण व्यक्तिस्वातंत्र्य फार वाढलें की समाजाची घडी बिघडेल, व उलट समाजबंधनें व्यक्तीवर फार लादलीं तर त्याचें स्वातंत्र्य कोठें राहिलें ? तेव्हां समाजाच्या योग्य व्यवहारांत कोणाहि व्यक्तीची

आडकाठी येऊं नये एवढी खबरदारी घेऊन व्यक्तीला पूर्ण स्वातंत्र्य द्यावें असें आज सुसंस्कृत माणसांचें मत बनलें आहे व त्याप्रमाणें व्यक्तीला बरेंच स्वातंत्र्यहि लाभलें आहे.

---

## प्रकरण ११ वें

# जागतिक शांतता व आंतरराष्ट्रीय वृत्तीची वाढ

**राष्ट्राराष्ट्रांतील चुरस व ती थांबविण्यासाठीं उपाय : सार्वराष्ट्रीय कोर्ट**

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें जग हें विश्वकुटुंब बनून मनुष्याला शास्त्रीय सुधारणांपासून मिळत असलेल्या परम सुखाची अखंड प्राप्ति होण्यास जगांत अक्षय्य शांतता नांदली पाहिजे; कोणी कोणाच्या उगाच वाटेस जाऊं नये, दुसऱ्याच्या मत्तेचा अपहार करूं नये म्हणून कडक निर्बंध पाहिजेत. हे निर्बंध एकटीं दुकटीं माणसें पाळतील पण प्रबळ आणि महत्त्वाकांक्षी राष्ट्रें कशीं पाळणार ? एक राष्ट्र शेजारच्या राष्ट्रांहून जरा जोरकस झालें कीं, लगेंच वरचढपणा करावयास लागतें. त्यामुळें सबंध खंडांत शांततेचा भंग होतो. यासाठीं राष्ट्राराष्ट्रांत बलसमता राखण्याचें तत्त्व पुढें आलें. गेल्या शतकांत युरोपमध्यें या तत्त्वाची फ्रान्स, जर्मनी आणि रशिया या राष्ट्रांपैकीं, कोणालाच जास्त वर डोकें काढूं न देण्यासाठीं अंमलबजवणी चालली होती. यांपैकीं एक राष्ट्र बलिष्ठ होत चाललें असें दिसतांच दुसरीं राष्ट्रें त्याविरुद्ध एक होत. तथापि गेल्या शतकाच्या उत्तरार्धांत प्रत्येक युरोपियन राष्ट्र आपलें लष्करी सामर्थ्य वाढवीत

चाललें होतें. १८७०-७१ सालीं फ्रान्स आणि जर्मनी यांच्यामध्यें मोठें युद्ध होऊन फ्रान्सचा जेव्हां कल्पनातीत पराभव झाला तेव्हां पासून जर्मन साम्राज्यांची महत्त्वाकांक्षा बळावली व समुद्रावर इंग्लंडहून जास्त स्वामित्व मिळविण्यासाठीं कायझर बादशहानें जर्मन आरमाराची वाढ व सुधारणा केली. फ्रान्स आणि रशिया हीं राष्ट्रेंहि, जर्मनीशीं यशस्वी टक्कार देतां यावी, म्हणून आपआपली लष्करी तयारी ठेवूं लागलीं. इंग्लंडनेंहि जर्मनीचा डाव ओळखून आपलें आरमार वाढविलें. या सर्व चिन्हांवरून लवकरच एक मोठें युद्ध होऊन भयंकर प्राणहानि होईल, असा दूरदर्शी युरोपियन मुत्सद्यांचा होरा वाहूं लागला. तेव्हां हा भावी अनर्थ थांबविण्यासाठीं हेग येथें राष्ट्र-प्रतिनिधींच्या बैठकी झाल्या व ज्यावरून राष्ट्राराष्ट्रांत लढाया होण्याचा संभव असेल ते आंतरराष्ट्रीय प्रश्न शांततेच्या मार्गांनीं सोडविण्यासाठीं एक सार्वराष्ट्रीय न्यायकोर्ट स्थापन झालें. या कोर्टामार्फत बरेच किरकोळ वादाचे प्रश्न सुटून गेल्या महायुद्धापर्यंत साधारणपणें युरोपला व त्याच्या अनुषंगानें सर्व जगाला शांतता लाभली असली तरी बराच काळ धुमसत असलेला ज्वालामुखी विझला नाहीं. आंतरराष्ट्रीय न्यायनिवाडयामुळें नॉर्वे आणि बल्गेरिया यांचें स्वतंत्र राज्य सर्वांनीं मुकाटयानें मान्य केलें. उत्तरसमुद्र आणि भूमध्यसमुद्र यांवरील हक्कांचा लढा शांततेनें मिटला. तसेंच राष्ट्रांच्या सरहद्दी ठरविण्याच्या प्रसंगीं जे रक्तपात होतात ते टळले. याप्रमाणें शांतता नांदविण्यासाठीं राष्ट्राराष्ट्रांत सलोखा उत्पन्न करण्याचें महत्त्वाचें काम हेगच्या शांतता परिषदेनें केलें व तेंच काम आज राष्ट्रसंघ मोठ्या प्रमाणावर करीत आहे.

## जागतिक शांतता व आंतरराष्ट्रीय वृत्तीची वाढ

याप्रमाणें आंतरराष्ट्रीय वृत्ति ठेवून सर्व जगांत शांतता नांदूं देण्याचें धोरण जर्मनीच्या महत्त्वाकांक्षेच्या आड येऊं लागलें. इंग्लंडशीं चुरस धरून तिनें आपलें लष्करी बल अपरंपार वाढविलें होतें. तेव्हां लवकरच केव्हांना केव्हां तरी कांहीं क्षुल्लक कारण काढून जर्मनी युद्धांत शिरणार व इंग्लंड आणि इतर त्याचीं दोस्त राष्ट्रें यांच्याशीं टक्कर देणार अशीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं. ता. २८ जून १९१४ रोजीं ऑस्ट्रियाचा युवराज आर्च डयूक फ्रान्सिस फर्डिनंड याचा जेव्हां बॉस्नियाची राजधानी सेराजेव्हो येथें भर रस्त्यांत खून पडला व सर्व्हिया आणि ऑस्ट्रिया यांच्यांत पुढें एका महिन्यानें युद्ध सुरू झालें, तेव्हां युरोपांतील एकूण एक राष्ट्रें कोणच्याना कोणच्या तरी बाजूस मिळून महायुद्धाचा भयंकर वणवा पेटला. चीन, जपान, अमेरिका, कानडा, दक्षिण आफ्रिका, ऑस्ट्रेलिया आदिकरून ब्रिटिश साम्राज्याचे भाग म्हणजे बहुतेक जगच या युरोपियन युद्धांत सामील झालें.

गेलें महायुद्ध: कारणें

शास्त्रीय शोधांचा उपयोग मनुष्याच्या कल्याणासाठीं जसा करण्यांत येतो, तसाच तो फार मोठया प्रमाणांत त्याच्या नाशासाठींहि करण्यांत येतो. याचें अगदीं उघड प्रत्यंतर आलें. पूर्वीच्या अवजड बंदुका-तोफा जाऊन त्यांच्या जागीं यंत्राच्या साहाय्यानें उडविल्या जाणाऱ्या बंदुका-तोफा आल्या-कारणानें भयंकर प्राणहानि होऊं लागली. पूर्वीं मोठया बळकट आणि उंच डोंगरी किल्ल्यांत आश्रय करून राहिलें म्हणजे भीति नसे; पण गेल्या महायुद्धांत दहा मैलांवर गोळा टाकून लोखंडी तटहि फोडणाऱ्या

यांत्रिक युद्ध: शास्त्रज्ञानाचा दुरुपयोग

तोफा उपयोगांत आणल्या होत्या. दर्यावर्दी युद्धांतहि अशाच भयंकर सुधारणा झाल्या आहेत. टॉर्पेडो, माइन ( पाणसुरुंग ), सबमरीन या नौकाविनाशक जहाजांमुळें मोठया गलबतांनाहि धोका पोहोंचतो. अशा धोक्यापासून आपली सुरक्षितता राखण्यासाठीं व शत्रूंच्या जहाजांचा संहार करण्यासाठीं डिस्ट्रॉयर, ड्रेडनॉट, क्रूझर, मॉनिटॉर यांसारख्या बोटी तयार करण्यांत आल्या. यांखेरीज विषारी धूर, विमानांतून बॉंब टाकणें, लांबून आगी लावणें वगैरे प्राणहारक शास्त्रीय साधनें दिमतीला होतींच. विमानें आणि वायरलेस यांचा दुरुपयोगच करण्यांत आला असें म्हटलें पाहिजे.

**महायुद्धाचे परिणाम**

हें महायुद्ध चार वर्षे टिकलें व हीं संकटाचीं चार वर्षें चार युगांप्रमाणें सर्व जगाला वाटलीं असतील, यांत आश्चर्य नाहीं. कारण सर्व खंडांतून महागाई व दुष्काळ सुरू झाले. युद्ध चालविण्यासाठीं सर्वच ठिकाणांहून अनेक रूपांनीं पैसा गोळा करण्यांत आला होता. त्यामुळें सर्वच युद्धयमान राष्ट्रें दारिद्री झालीं. लोक लढाईंत गुंतल्यामुळें शेतांतून व कारखान्यांतून राबावयास कोणी राहिलें नाहीं. जें कांहीं थोडें उत्पन्न येत असे तें शत्रूंकडून लुबाडलें जाई. तेव्हां साहजिकच युद्ध बंद पडल्यानंतर लोकांचे हाल वांचले नाहींत. उलट दुष्काळ आणि रोगराई जगांत सर्व भागांतून पसरलीं. इन्फ्लुएंझाच्या सांथीनें तर लाखों लोक किडया-मुंग्यांप्रमाणें पटापट मृत्युमुखीं पडले. रोजचे खाण्याचे पदार्थ बेसुमार महाग झाले. कपडाहि अंगावर घ्यावयास पुरता मिळेना. रहावयाचीं घरें तरी स्वस्त भाड्यांत मिळावींत; पण तींसुद्धां अवाच्यासव्वा

भाड्यानें जाऊं लागलीं. अशा रीतीनें जगाच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत आपत्ति कोसळली व युद्धापासून काय अनर्थ ओढवतात याची प्रत्येकालाच प्रत्यक्ष जाणीव झाली. जग हें आतां पूर्वीसारखें विस्कळीत आणि तुटक तुटक राहिलें नसून तें इतकें एकजीव बनलें आहे कीं, एका भागांत कांहीं हालचाल झाली कीं, तिचे धक्के इतर सर्व भागांत बसतात. जगांत शांनता नांदवावयाची असल्यास सर्वच भागांत ती राखिली पाहिजे असें अनुभवांतीं कळून आलें.

राष्ट्रसंघाचा उदय

तेव्हां जगांत शांतता राखण्यासाठीं आंतरराष्ट्रीय व्यवहाराकडे एखाद्या सार्वराष्ट्रीय प्रातिनिधिक मंडळानें पूर्णपणें लक्ष पोहोंचविलें पाहिजे व राष्ट्राराष्ट्रांतील चुरस आणि भांडणें न्यायकोर्टाप्रमाणें निकाल करून मिटविलीं पाहिजेत, अशी तळमळ त्या वेळचे अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांचे अध्यक्ष डॉ. विल्सन यांना लागली, व त्यांनीं लगेंच राष्ट्रसंघाची कल्पना पुढें ठेविली. ज्या तत्त्वांवर हा राष्ट्रसंघ निर्माण करावयाचा त्या डॉ. विल्सन यांच्या सुप्रसिद्ध चौदा तत्त्वांपैकीं पुढील कांहीं महत्त्वाचीं अशीं आहेत: समुद्र सर्वांना खुले असावेत; शस्त्रास्त्रांवर निर्बंध घालावेत; मुलखगिरीचा हक्क कोणाहि राष्ट्राला नसावा; प्रादेशिक राज्यव्यवस्था मानववंशविचारानुसार करावी; व सर्व राष्ट्रें स्वतंत्र आणि समान दर्जाचीं असावींत. याप्रमाणें ही राष्ट्रसंघाची कल्पना सर्व खंडांतील राष्ट्रांना पटून पंचविसांवर स्वतंत्र राष्ट्रांनीं या शांततातहावर सह्या करून राष्ट्रसंघ स्थापन केला. या राष्ट्रसंघाची मुख्य कचेरी जिनेव्हा(स्वित्झर्लंड) येथें असून तेथें वारंवार सभासद राष्ट्रांच्या बैठकी होतात.

जागतिक शांततेच्या कामीं राष्ट्रसंघाचा उपयोग

राष्ट्रसंघ निघाल्यापासून त्याचे प्रत्यक्ष फायदे बऱ्याच वेळां दिसून आले. त्याच्या स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाप्रमाणें पोलंड, युगोस्लाव्हिया, चेकोस्लोव्हाकिया इत्यादि पारतंत्र्यांत बुडून राहिलेले कांहीं देश स्वतंत्र झाले. जर्मनी, रशिया, ऑस्ट्रिया यांसारखीं जुनीं राजसत्ताक राष्ट्रें लोकसत्ताक झालीं. रशियांत तर पूर्ण समाजसत्ता नांदत आहे. राष्ट्राराष्ट्रांमध्यें मध्यस्थी करून आजपर्यंत बऱ्याच वेळां राष्ट्रसंघानें युद्धें टाळलीं आहेत. जागतिक शांतता आणि स्वस्थता या दृष्टीनेंहि आर्थिक परिषद, मजूरपरिषद, शेतकीपरिषद, शिक्षण-परिषद, वैद्यक-परिषद वगैरे अखिल राष्ट्रांतील प्रतिनिधींच्या परिषदा भरवून बरेंच काम केलें आहे. राष्ट्रसंघाच्या परिषदांना निर-निराळ्या आणि दूरदूरच्या देशांचे प्रतिनिधी जमावयास लागल्यापासून जिकडेतिकडे आंतरराष्ट्रीय वृत्ति दिसून येत आहे. कोणतीहि चळचळ जगांतील संघशक्तीनें पार पाडली जात आहे. नुकतीच गुदस्तां इंग्लंडांत बालवीरांची जी जांबोरी झाली, तिला जगांतील बेचाळीस राष्ट्रांतून पन्नास हजार बालवीर गेले होते. म्हणजे लहानपणींच मुलांमध्यें आंतरराष्ट्रीय वृत्ति आणि दृष्टि आणण्याचा हा प्रयत्न जगाच्या शांततेच्या कामीं किती चांगला होणार हें स्पष्ट करावयास नकोच.

---

उपसंहार

# मानवी संस्कृतीचें भवितव्य

जगांत मनुष्यप्राणी निर्माण झाल्यापासून एकाच ठिकाणीं न रहातां

**मनुष्याची सुधारणा-प्रवृत्ति**

तो सर्वत्र फिरला. एक शाखा डोंगरपर्वत ओलांडून हिंदुस्थानांत शिरली व ती थेट खालपावेतों गेली. दुसरी एक मानववंशशाखा पश्चिमेकडे युरोपखंडांत पसरली व अटलँटिक महासागर ओलांडून तिनें अमेरिका वसविली. इतर प्राण्यांप्रमाणें माणूस निर्बुद्ध नसल्यानें रोज कांहीं नवीन शिकतो व शिकवितो. ज्या पृथ्वीच्या पाठीवर तो रहातो तीवर त्याला जें जें कांहीं जास्त जास्त आढळून येतें तें तें सर्व तो मोठ्या मेहनतीनें आणि कौशल्यानें आपल्या कामीं लावतो व आपलें आयुष्य अधिकाधिक सुखकर करून घेतो. आपल्या सुखासाठींच तो शेजाऱ्याला मदत करतो व त्याचा शेजारीहि याला परत मदत देतो; याप्रमाणें एक दुसऱ्याला, दुसरा तिसऱ्याला, तिसरा चवथ्याला असें सर्व जग बांधलें गेलें आहे. एकाचा शोध किंवा कल्पना ती सर्वांच्याच मालकीची. एका देशाचा पंडित किंवा कवि तो सर्व जगाचा पंडित. एका राष्ट्राची अडचण ती सर्वच राष्ट्रांची आपत्ति. व्यापार आणि दळणवळण हीं तर माणसाच्या सुधारणेचीं मुख्य साधनें आहेत; हीं साधनें आज अतिशय जोरदार आणि कार्यक्षम बनलीं आहेत. यामुळें मानवी संस्कृति आणि सुधारणा यांची सारखी वाढच होत जाणार आहे.

भविष्यकालीन जगाचा विकास

भविष्य काळीं जगांतील सर्व राष्ट्रांची संस्कृति साधारणपणें एक जातीची होईल असें वाटतें. कारण कोणतेंहि सुधारलेलें राष्ट्र दुसऱ्या सुधारलेल्या राष्ट्रांप्रमाणेंच वागत असतें. मागसलेलीं राष्ट्रें देखील सुधारलेल्या राष्ट्रांचा कित्ता सर्वच बाबतींत गिरवितात. यावरून पुढें सर्व जगाची संस्कृति एकच राहील अशी कल्पना होते. मानवी सुखाच्या दृष्टीनें जगाचा विकास होईल कां अवनति येईल हा वाद विचारी लोकांत नेहेमीं चालतो व कोणी जगाच्या उत्कर्षाकडे निराशेनें पहातात तर दुसरे मोठे आशावादी दिसतात. ज्यांत मनुष्यसुखाची परमावधि असते तें सत्ययुग मागें होऊन गेलें कीं, पुढें यावयाचें आहे? मागील काळापेक्षां आज मनुष्याची रहाणी किती तरी सुधारलेली आहे व मनुष्याची बुद्धि किती तरी सर्वव्यापी झाली आहे! विश्वव्यापारावर मनुष्याचा आज जितका ताबा आहे, तितका मागें केव्हांहि नव्हता. तसेंच एकंदर जगाची पूर्ण ओळख होऊन आपणांला निर्भयपणें आणि सहज जसें आज त्यांत वावरतां येतें तसें मागें कधीं येत होतें काय? ‘ वसुधैव कुटुंब ’ ही वृत्ति आज जितकी माणसांत खिळली आहे तितकी गेल्या शतकांतहि दिसत नव्हती. अशा रीतीनें शुद्ध मनानें विचार केल्यास जगाची संस्कृति विकसत आहे अशीच खात्री होईल.

---

## परिशिष्ट १

# मानववंश

जगांतील मनुष्यप्राण्याच्या जाती ठरवितांना वेगवेगळीं साधनें वापरतात. सामान्यत: अंगाच्या रंगावरून (१) श्वेतवर्णी, (२) पीतवर्णी व (३) कृष्णवर्णी असे तीन ठोकळ विभाग करण्यांत येतात. भाषाभेदांवरून श्वेतवर्णीयांत पुन्हा ( अ ) आर्य, ( आ ) हॅमिटिक असे पोटविभाग पडतात. हॅमिटिक वर्गांतील प्रमुख लोक म्हणजे प्राचीन इजिप्शियन किंवा मिसरी. सेमिटिक लोकांनीं आशिया खंडाचा नैऋत्य भाग व्यापिला होता. बाबिलोनी, असुरी, अरब, ज्यू आणि फिनिशियन हे लोक सेमिटिक कुळांतीलच होत. यांपैकीं फक्त अरब आज शिल्लक आहेत. आर्य लोकांची एक शाखा इराणच्या मार्गानें हिंदुस्थानांत आली व दुसरी अरबस्तानांतून युरोपकडे गेली. भारतीय आणि पर्शु ( इराणी ) हे जसे आर्य तसेच ग्रीक आणि रोमन हेहि आर्यच होते. आर्यमहावंशांतील जर्मानिक वंशांत जर्मन, स्कॅन्डिनेव्हियन आणि इंग्रज मोडतात. तसेंच लॅटिन भाषेपासून निघालेल्या युरोपीय भाषा बोलणारे इटली, फ्रान्स आणि स्पेन देशांतील लोक आर्यवंशज आहेत. युरोपांतील आणखी दोन आर्यशाखीय लोक म्हणजे केल्ट आणि स्लाव्ह. स्कॉच, आयरिश आणि वेल्श हे लोक केल्टकुळांतील व रशियन आणि पोल ( पोलंडमधील ) हे प्रमुख स्लाव्ह आहेत.

( २ ) पीतवर्णी लोक आशिया खंडाच्या पूर्व, उत्तर आणि मध्य भागांतून आहेत. चिनी आणि जपानी हे प्रसिद्धच आहेत. इतर

मोंगल महावंशांतील लोक म्हणजे कोरियन, मांचू, तिबेटी, अनामी आणि ब्रह्मी. अमेरिकेंतील रेडइंडियन आणि पॉलिनेशियन ( पॅसीफिक समुद्रांतील बेटांवरचे लोक ) याच मानववंशांतील पण मोंगल लोकांपेक्षां अगदीं वेगळे वर्ग आहेत. युरोपमधील तुर्क, मग्यार ( हंगेरियन ), लॅप, फिन्, आणि बास्क हेहि मोंगल कुळांतीलच म्हणून धरण्यांत येतात.

( ३ ) या विभागांतील लोक म्हणजे नीग्रो होत. हे नीग्रो मूळचे आफ्रिका आणि ऑस्ट्रेलिया खंडांतले असून त्यांना इतर दोन महावंशांतील लोकांनीं गुलाम बनविलें. अमेरिकेंत तर इतके नीग्रो गुलाम नेण्यांत आले कीं, पुढें त्यांची संख्या त्यांच्या युरोपियन मालकांना जाचूं लागली. गुलामगिरीचें अजिबात उच्चाटण झाल्यापासून नीग्रो लोक अमेरिकेंत स्वतंत्र नागरिक म्हणून रहात आहेत.

या तीन मानवमहावंशांची लोकसंख्या साधारणतः अशी देतां येईल:

| | |
|---|---|
| श्वेतवर्णी | ७२६००० हजार |
| पीतवर्णी | ७३०००० हजार |
| कृष्णवर्णी | १९०००० हजार |
| एकूण | १६४००६० हजार |

---

## परिशिष्ट २

# भाषावंश

मानवसंस्कृतीच्या इतिहासांत भाषेला विसरून चालावयाचें नाहीं. भाषाशास्त्राची वाढ सुधारणेच्या प्रमाणांत बहुश: असते. मनुष्य जसा पृथ्वीच्या पाठीवर भटकतो तशी भाषाहि त्याच्या मागोमाग भटकत जाते. भाषांची देवघेव तर एकसारखी चाललेली असते. मनुष्याचें साम्राज्य व भाषेचें साम्राज्य हीं बरोबरीनेंच सत्ता गाजवीत असतात. जेते लोक आपली भाषा जितांवर लादतात अशीं अनेक उदाहरणें आढळतील. मानववंशांप्रमाणें भाषावंशहि ठरविण्यांत आले आहेत. जगांतील मोठमोठे भाषावंश पुढील होत:

( १ ) आर्यभाषावंश—यांत भारतीय, इराणी, जर्मानिक, इटालिक, केल्टिक, स्लॅव्हॉनिक वगैरे भाषा मोडतात.

( २ ) द्राविडी वंश—हिंदुस्थानांतील तामिळ, तेलगू , कानडी, वगैरे दक्षिण हिंदुस्थानांतील भाषा.

( ३ ) सेमिटिक वंश—असुरियन, खनानी आणि अरबी भाषा.

( ४ ) हॅमिटिक वंश—इजिप्शियन, लिबियन आणि एथिओपियन भाषा.

( ५ ) अमेरिकन भापावंश—रेड इंडियन लोकांच्या शंभरांवर भाषा यांत येतात.

( ६ ) आफ्रिकन भाषावंश—नीग्रो लोकांच्याहि बऱ्याच भाषा असून त्यांचा एक स्वतंत्र संघ बनतो.

यांखेरीज जपानी, बास्क, कॉकेशस वगैरे दहांवर महाभाषासंघ निघतील.

जगांतील प्रमुख संस्कृती आर्य लोकांच्याच असल्यानें त्यांची आर्य भाषा आज जगांत कशी पसरली आहे हें पुढील मांडणीवरून स्पष्ट होईल.

आर्यन किंवा इंडो-जर्मानिक भाषावंश

१. पूर्व आर्यन
किवा
आशियाटिक

१. पश्चिम आर्यन
किंवा
युरोपियन

( १ ) पूर्व आर्यन किंवा आशियाटिक




( २ ) पश्चिम आर्यन किंवा युरोपियन
ग्रीक
अल्बेनियन
इटालिक
केल्टिक
स्लॅव्हॉनिक
बाल्टिक
जर्मानिक
आयरिश, वल्स, गॉलिक
लिथुआनियन लेटिश
इटालियन
फ्रेंच
स्पॅनिश
पोर्तुगीज
रुमानियन
रशियन
पोलिश
बोहेमियन
सर्व्हियन
बल्गेरियन
स्कॅन्डिनेव्हियन
पश्चिम जर्मानिक
आइसलँडिक
नॉर्वेजियन
स्वीडिश
डॅनिश
सॅक्सन ( जुनी )
डच
फ्लेमिश
इंग्लिश
जर्मन

## परिशिष्ट ३

# जगांतील धर्म

आज जगांतले प्रमुख धर्म म्हणजे हिंदु, ख्रिस्ती, मुसलमान आणि बौद्ध हे होत. चीनमधील कन्फ्युशियन आणि ताओ धर्म लोकसंख्येच्या दृष्टीनें पाहिल्यास ख्रिस्ती धर्माच्या खालोखाल येतात, पण ते इतर धर्मांप्रमाणें चीनच्या बाहेर पसरले नसल्यानें प्रख्यात नाहींत.

| धर्म | | लोकसंख्या |
|---|---|---|
| ख्रिस्ती | .... | ५६४५१० हजार |
| हिंदु | .... | २१०५४० ,, |
| मुसलमान | .... | २२१८२५ ,, |
| बौद्ध | .... | १२८०३१ ,, |
| ज्यू | .... | १२२०५ ,, |
| कन्फ्युशियन आणि ताओ | .... | ३००८३० ,, |
| शिंतो | .... | २५००० ,, |
| इतर | .... | १५२८० ,, |
| रानटी | .... | १५८२७० ,, |

ख्रिस्ती संस्कृतीप्रमाणेंच ख्रिस्ती धर्माची छाप जगावर किती आहे हें वरील आकडयांवरून दिसेल.

---